नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

**संपादक :** नीलिमा गुंडी
**संपादकीय-सल्लागार :** अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले
**संपादन-समिती :** नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनन्द काटीकर
**संपादकीय पत्रव्यवहार :** नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002. संपर्क : (020) 2448 6015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनन्द काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004.
चलभाष : 094216 10704
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 095459 50808 **विजय पाध्ये** - 098220 31963. marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) **वार्षिक वर्गणी** - एक वर्ष / तीन वर्षे / पाच वर्षे

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| **व्यक्ती :** | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| **संस्था :** | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/-+ नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'अॅट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान ₹ **२,५००/-**, अर्धे पान ₹ **१,५००/-**, पाव पान ₹ **८००/** शुभेच्छा ₹ **४००/-**, आवरण पृष्ठ तीन ₹ **३,०००/-** जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**

# अनुक्रमणिका

**संपादकीय** / ग्रंथव्यवहार आणि संस्कृती / नीलिमा गुंडी /३
**भाषांतरकार्याची जटिलता** / अक्षयकुमार काळे /६
**मराठी भाषा आणि तिचा भाषिक समाज** / नंदकुमार मोरे /१३
**अनुवाद** /प्राचीनतम भाषा आणि आदिम भाषा / चिन्मय धारूरकर /१८
**अहिराणी बोलीचे शब्दविशेष** / सुधीर रा० देवरे /२६
**ऐनापूर शिलालेखातील भाषाविशेष** / नीलेश केदारी शेळके /३५
**झुंजार सामंतबाई** / दिवाकर मोहनी /४०
**शब्दायन** / यार, नाखुदा, कैसर आणि शहानशहा / मो०गो० धडफळे /४४
**ई-शब्दचर्चा / पखालपार्वती** /४७
**पखालपार्वती** / मा०ना० आचार्य /५७
**पुस्तक परीक्षण / मराठीचे आधुनिकीकरण** / सुमन बेलवलकर /६०
**महाजालावरील मराठी / महाराष्ट्र ज्ञानकोश** / सुशान्त शंकर देवळेकर /६५
**दखलयोग्य / संपादक संवादसभा** / वसंत आपटे, भानू काळे /६८
**पुनर्भेट / महाराष्ट्रजनविज्ञापना** / गंगाधर मोगरे /७०
**भाषा-वार्ता** / (१) मराठीला अभिजात दर्जा मिळण्याबाबत /२
(२) जपानमधील तमीळ भाषेचे अभ्यासक /२
(३) महाराष्ट्र सरकारचे मराठी भाषाविषयक धोरण/२
**परिषद-वार्ता** / (१) महाराष्ट्र दिनानिमित्त मुलाखत /७२
(२) संगणक आणि मराठी भाषा /७३
(३) डॉ० माधव देशपांडे यांच्याशी गप्पा /७३
(४) कार्यकारी मंडळातील बदल/७१
**प्रतिसाद** / (१) गेले काही अंक / भालचंद्र नेमाडे /७४
(२) वर्किंग लंच / अनघा भट-बेहेरे /७४
(३) शिक्षणाचे माध्यम / माधवी कोल्हटकर /७५
(४) घोषवाक्यातील दुरुस्ती / कालिदास मराठे /७६
(५) घोषवाक्यातील दुरुस्ती / अ०ना० कुंभार /७७
(६) राईलकरांच्या अनुवादाबाबत... / सुप्रिया सहस्रबुद्धे /७८
**खुलासा** /७९
**श्रद्धांजली** /५६
**पानपूरके** /१२,२५,४३,४६,४९,५९,६४,६७,६९,७१,७८
**लेखक-परिचय** /७९,८०+मलपृष्ठ ३

**मुखपृष्ठ :** सलील वाघ

## १. मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळण्याबाबत...

मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळण्यासंबंधीचा अंतिम अहवाल रंगनाथ पठारे यांच्या समितीने ३१ मे २०१३ला महाराष्ट्र राज्य सरकारला सादर केला आहे. राज्य सरकार हा अहवाल केंद्र सरकारच्या सांस्कृतिक खात्याकडे पाठवील, त्यानंतर तो साहित्य अकादमीकडे जाईल. ■

## २. जपानमधील तमीळ भाषेचे अभ्यासक

तमीळ भाषेचे जपानमधील प्रख्यात अभ्यासक नोबुरी काराशिमा यांना पंतप्रधानांच्या हस्ते पद्म पुरस्कार प्रदान करण्यात आला. पंतप्रधानांनी दुसऱ्या देशात जाऊन तेथील नागरिकाला भारताचा नागरी सन्मान देण्याची घटना दुर्मीळ आहे. प्रकृती अस्वास्थ्यामुळे ८० वर्षांचे काराशिमा यांना हा सन्मान स्वीकारण्यासाठी भारतात येणे शक्य झाले नव्हते. काराशिमा हे टोकियो विद्यापीठात सन १९६४पासून अध्यापन करीत आहेत. तेथील दक्षिण आशियाच्या इतिहासविषयक अध्यासनाचे ते २० वर्षे प्रमुख होते. त्यांनी चेन्नईतील मद्रास विद्यापीठात अनेक वर्षे दक्षिण भारताचा इतिहास आणि शिलालेख यांचा अभ्यास केला आहे. त्यांनी तमीळ उत्तम बोलता येते. ■

[संदर्भ : महाराष्ट्र टाइम्स, २९ मे २०१३]

## ३. महाराष्ट्र सरकारचे मराठी भाषाविषयक धोरण

येत्या २५ वर्षांसाठी महाराष्ट्र राज्य सरकारचे मराठी भाषाविषयक धोरण लोक-सहभागातून ठरविण्यासाठी भाषा सल्लागार समितीची पहिली बैठक महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे येथे ८ मे २०१३ला झाली. समितीचे अध्यक्ष डॉ० नागनाथ कोत्तापल्ले यांच्या उपस्थितीत झालेल्या या बैठकीत डॉ० प्र०चिं० शेजवलकर, डॉ० माधवी वैद्य, विद्या बाळ, प्र०ना० परांजपे, नीलिमा गुंडी, भानू काळे, भारत सासणे, अरुण जाखडे, विवेक सावंत आदी सहभागी झाले होते. विद्यापीठात स्वतंत्र मराठी विभाग, मराठी माध्यमाच्या शाळांमधील मराठी व इंग्रजी शिक्षणाचा दर्जा सुधारण्याची योजना, मराठीतून 'वृत्तसंस्था' अशा अनेक सूचना त्या वेळी करण्यात आल्या.

अशा बैठका महाराष्ट्रात इतरत्रही घेतल्यानंतर अंतिम अहवाल सरकारला सादर करण्यात येणार आहे. ■

संपादकीय

# ग्रंथव्यवहार आणि संस्कृती

नीलिमा गुंडी

संस्कृतीचे जतन आणि संवर्धन करणारा एक घटक म्हणून ग्रंथांना महत्त्वाचे स्थान असते. ग्रंथव्यवहाराच्या इतिहासाकडे दृष्टिक्षेप टाकला की ग्रंथव्यवहार आणि संस्कृती यांच्या परस्परसंबंधाचा एक आलेख समोर येतो. त्यासाठी मुद्रणपूर्व कालखंडापासून आजच्या इलेक्ट्रॉनिक माध्यमयुगापर्यंतचे काही टप्पे लक्षात घ्यावे लागतात.

मुद्रणपूर्व कालखंडात - पंधराव्या शतकात - मराठीत साहित्यनिर्मिती झालेली होती. त्या काळी ग्रंथ नकल करून देण्याचा व्यवसाय केला जात असे. संस्थानिक व धनिक वर्ग यांच्याकडून अशा नकलांना मागणी असे. 'ग्रंथदानविधी' नावाच्या पोथीत कोणता ग्रंथ दान केला असता काय फळ मिळते. हे दिले आहे. शरद गोगटे यांच्या 'मराठी प्रकाशनाची २०० वर्षे' या पुस्तकातील माहितीनुसार त्या काळी महाभारत १५० ते २०० रुपयांपर्यंत विकले जात असे. ग्रंथदानविधीच्या रूपाने ग्रंथव्यवहाराला धार्मिक अधिष्ठान देऊन चालना देण्याची ही पद्धत त्या काळच्या धर्मकेंद्री संस्कृतीला साजेशीच ठरते.

ग्रंथनिर्मितीत झालेले बदल हे काही बाबतीत आपल्या सांस्कृतिक परिवर्तनाशी - आधुनिकीकरणाशी - निगडित आहेत, हे लक्षात घ्यावयास हवे. ग्रंथलेखनासाठी वापरला जाणारा कागद समाजाने स्वीकारणे; हेही परिवर्तनाचे एक चिन्ह होते. कागद हा चिंध्या वापरून तयार केला जातो, म्हणून त्याचा विटाळ मानण्याकडे काहींचा कल होता. मात्र ज्ञानकोशकार डॉ० श्री०व्यं० केतकर यांनी नमूद केले आहे की मराठी कर्मठ मंडळींनी कागदाचा विटाळ मानलेला दिसत नाही.

भारतात पहिला छापखाना गोव्याला १५५६मध्ये आला. तेथून आपल्याकडे मुद्रणयुग अवतरले. भारतीय भाषांतील मजकूर रोमन लिपीत छापण्याचे काम सुरू झाले. फादर स्टीफन्स यांचा 'ख्रिस्तपुराण' हा मराठी ग्रंथ १६१६मध्ये रोमन लिपीत छापला गेला. १८०५मध्ये कोलकात्याजवळ श्रीरामपूर (सेरामपूर) येथे प्रकाशित झालेले 'A Grammar of the Mahratta Language' हे विल्यम कॅरे यांचे पुस्तक म्हणजे 'देवनागरी मुद्राक्षरे वापरून छापलेले पहिले मराठी पुस्तक' असे मानले जाते. पण १८०५मध्येच मिरज आणि तंजावर येथे झालेल्या देवनागरीतील ग्रंथमुद्रणाची माहिती शरद गोगटे यांनी दिली आहे. तंजावरच्या 'नवविद्याकलानिधी' मुद्रणालयात

'बालबोधमुक्तावली' हे पुस्तक छापले गेले. तर मिरजेला श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील श्लोकांचे तांब्याचे ठसे करून, लाकडी मुद्रणयंत्र वापरून लाखी शाईने गीतेच्या २०० प्रती छापल्या गेल्या. त्यामागे नाना फडणीस यांची प्रेरणा होती. अर्थात विल्यम कॅरे यांचा ग्रंथ मराठी शिकणाऱ्या मंडळींना उपयुक्त असल्यामुळे त्याचे महत्त्व ग्रंथप्रसाराच्या दृष्टीने अबाधित राहिले.

या ग्रंथप्रसाराच्या कामात मिशनरी मंडळींचा वाटा मोठा होता. मात्र त्यांच्या धर्मप्रसाराच्या हेतूमुळे सर्वसामान्य लोकांच्या मनात त्यांच्याविषयी अढी होती. त्यामुळे छापील पुस्तकांनाही विरोध होत असे. छपाईच्या शाईत चरबी असते, हेही त्या विरोधामागचे एक कारण होते. हे लोकमत लक्षात घेऊन गणपत कृष्णाजी पाटील यांनी १८३१मध्ये मुद्रण-प्रकाशनाची मुहूर्तमेढ रोवली. त्यांनी 'पंचांग' छापले आणि विशेष म्हणजे छपाईसाठी गाईच्या तुपातली शाई तयार केली! त्या पंचांगाला अर्थातच ग्राहकांकडून भरपूर मागणी आली.

ग्रंथनिर्मितीला प्रोत्साहन देणारा एक उपक्रम म्हणजे ग्रंथनिर्मितीसाठी पारितोषिकांची योजना, ही होय. ब्रिटिश राजवटीत 'हिंद शाळा आणि शाळा पुस्तक मंडळी'तर्फे १८२५मध्ये देशी भाषांतून लिहिलेल्या विविध विषयांवरील पुस्तकांना पारितोषिके देण्याची योजना जाहीर झाली. १८५१मध्ये स्थापन झालेल्या 'दक्षिणा प्राइज कमिटी'मुळेही ग्रंथप्रकाशनाला आर्थिक सहकार्य मिळू लागले. (आज ग्रंथनिर्मितीसाठी देण्यात येणाऱ्या पारितोषिकांची संख्या मोजणे कठीण झाले आहे!)

न्यायमूर्ती म०गो० रानडे यांच्या पुढाकाराने १८७० ते १८८० या दरम्यान सुरू झालेले सार्वजनिक उपक्रमही ग्रंथनिर्मितीला प्रोत्साहन देणारे होते. त्यातील 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी' (आजची 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्था', पुणे) आणि 'मराठी ग्रंथकारांचे संमेलन' (आजचे 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन') हे उपक्रम विशेष महत्त्वाचे ठरतात.

ग्रंथ म्हणजे ज्ञानार्जन, ज्ञानसंकलन, ज्ञानसंक्रमण यांचे माध्यम असल्यामुळे संस्कृतीच्या संदर्भात त्यांचे महत्त्व वादातीत ठरते. सुरुवातीच्या काळात ग्रंथांचे हे महत्त्व ओळखून काही प्रकाशकांनी मुद्रक, नियतकालिकाचे संपादक याबरोबरच लोकशिक्षक म्हणूनही भूमिका बजावलेली दिसते, तर काही लेखकांनी स्वत:च प्रकाशनाचे कामही केलेले दिसते. ग्रंथव्यवहारामध्ये ग्रंथकाराबरोबरच प्रकाशक, मुद्रक, चित्रकार, विक्रेते, ग्रंथपाल, ग्रंथसंग्राहक आणि वाचक आदी अनेकांचा समावेश असतो. मात्र आपल्याकडे लेखककेंद्री विचारच जास्त प्रमाणात होतो. या इतर घटकांचाही खरे तर विचार व्हायला पाहिजे. अरुण टिकेकर यांनी ग्रंथव्यवहाराला गती देणारे ग्रंथविक्रेते आणि ग्रंथसंग्राहक यांच्या अनेक रंजक आणि उद्‌बोधक आठवणी 'अक्षरनिष्ठांची मांदियाळी'मध्ये वर्णन

केल्या आहेत. टिकेकरांच्या मते ग्रंथसंग्राहकांच्या वर्गात 'मार्जिनॉलिया' संग्रहित करणाऱ्यांचाही एक छोटा वर्ग असतो. 'मार्जिनॉलिया' म्हणजे पुस्तकावर केलेल्या खुणा, स्वाक्षरी, स्वहस्ताक्षरात ग्रंथाच्या सुरुवातीला, पानावरील समासात वा शेवटी वाचकाने केलेले भाष्य इत्यादी. पुस्तकाचे हे रूप दस्तऐवजासारखे जपणारे ग्रंथसंग्राहक ग्रंथपरंपरा जाणून घेण्यासाठी उपयुक्त ठरू शकतात. मराठीच्या विकासासाठी ग्रंथसंग्राहकांचा लाभ मोठ्या प्रमाणात होणे गरजेचे आहे.

स्वातंत्र्योत्तर काळात शिक्षणाचा प्रसार, विविध सामाजिक चवळवळींमुळे आलेली जागरुकता, नवलेखक अनुदान योजना आदींमुळे ग्रंथनिर्मितीला वेग येत गेला. नवसाक्षर वर्गातून नवा वाचकवर्गही मिळत गेला. आजही वाचन हा छंद जोपासणारे अनेक लोक दिसतात. मात्र वाचनाकडे केवळ व्यक्तिगत छंद म्हणून न पाहता 'सामाजिक अभिसरणाचा घटक' म्हणूनही पाहायला हवे. 'वाचक' या घटकाचा जिज्ञासायुक्त, डोळस 'रसिक' या पदावर अधिकार सांगता येईल अशा स्वरूपात विकास करण्यासाठी उपक्रम राबवायला हवेत. अभिरुची आणि ग्रंथनिर्मिती यांचा संबंध अन्योन्य स्वरूपाचा असतो, हे विसरता येत नाही. आपल्या वाचकवर्गाच्या जिज्ञासाक्षेत्राचा जितक्या विविध अंगाने विकास होईल, तितके ग्रंथनिर्मितीला पोषक वातावरण तयार होईल.

आज बदलत्या तंत्रज्ञानामुळे ग्रंथव्यवहाराचे स्वरूप बदलत आहे. मराठीतील पहिला छापील ग्रंथ रोमन लिपीत होता. [आज 'एस०एम०एस०' आणि 'ई-मेल' लिहिताना मराठीसाठी सर्रास रोमन लिपीचा वापर होत आहे!] आज 'ई बुक' या रूपातही ग्रंथ आकार घेत आहे. तरुण वर्ग ई-वाचनाकडे वळत आहे. तंत्रज्ञानाचा प्रभाव असलेल्या या युगात ग्रंथनिर्मितीचे स्वरूपही बदलणे स्वाभाविक आहे. पण संस्कृतीचा संबंध सामाजिक व्यवहाराइतकाच व्यक्तीच्या भावजीवनाशीही असतो. ई-वाचन करताना पुस्तकाचे पान स्वत:च्या हाताने उलटण्याचा आनंद, पानांचा वास घेण्यातला आनंद मिळत नाही; अशी खंत वाचकांना वाटते. ही खंत दूर करण्यासाठी ई-वाचनही या अनुभवाच्या जवळ जावे म्हणून एक सॉफ्टवेअर तंत्रावली तयार होत असल्याचे कळते. एकंदरीत, ग्रंथव्यवहाराच्या स्वरूपातील बदलाची ही प्रक्रिया सांस्कृतिक अंगानेही बारकाईने न्याहाळण्याजोगी आहे.

**संदर्भसूची**

(१) 'अक्षरनिष्ठांची मांदियाळी', अरुण टिकेकर, डिंपल प्रकाशन, मुंबई, २००५.
(२) 'मराठी ग्रंथप्रकाशनाची २०० वर्षे', शरद गोगटे, राजहंस प्रकाशन, पुणे, २००८.
(३) 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण', श्री०व्यं० केतकर, प्रकाशक केतकर, पुणे, १९२८.

■

# भाषांतरकार्याची जटिलता

**अक्षयकुमार काळे**

सध्याचा काळ जागतिकीकरणाचा आहे.अतिशय वेगाने भिन्नभिन्न भाषिक समूह परस्परांच्या जवळ येत आहेत. त्यामुळे परस्परांच्या भाषाविशेषांचा प्रभाव परस्परांवर पडत आहे. ही प्रक्रिया पूर्वीपासूनच सुरू झालेली असली तरी त्याचे स्वरूप आज विश्वव्यापक होत आहे. त्यामुळे भाषांतराच्या प्रक्रियेला देखील विलक्षण गती प्राप्त झाली आहे. जमेल तशी भाषांतरे नित्य होत असली, तरी भाषांतराचे शास्त्र निर्माण होण्याची एक स्वाभाविक आवश्यकता देखील आज निर्माण झाली आहे. त्यामुळे नेटकी आणि मुळातील अर्थ आणि सौंदर्य लक्ष्य भाषेत आणणारी भाषांतरे करणे सुलभ होईल.

**एका भाषेतील मजकूर दुसऱ्या भाषेत उतरवून मूळ भाषेतील संहितेची दुसऱ्या भाषेत प्रतिसंहिता निर्माण करणे म्हणजे भाषांतर होय.** भाषांतराची अशी सुटसुटीत व्याख्या करता येणे शक्य असले, तरी भाषांतरमीमांसेत भाषांतराच्या कार्याची व्यापकता लक्षात घेता या व्याख्येला कितीतरी मर्यादा पडतील. भाषांतराचे कार्य एखाद्या भाषेत निर्माण झालेले वेगवेगळ्या प्रकारचे लेखन दुसऱ्या भाषेत आणणे हे होय. ह्या लेखनाचे स्वरूप इतके विविध प्रकारचे असते, की ते लेखन दुसऱ्या भाषेत आणायचे तर भाषांतरकार्याच्या स्वरूपाची विविधता आणि जटिलता लक्षात घ्यावीच लागणार.

**भाषांतराचे प्रकार**

सर्वसामान्य गद्य मजकुराचे भाषांतर तुलनेने सोपे असते. तथापि एका भाषेतील ललित वाङ्मयीन कृती दुसऱ्या भाषेत आणायची म्हटले की, त्यात केवळ 'शब्दशः भाषांतर करावयाचे नसून मूळ वाङ्मयीन कृतीचे सौंदर्य, तिची आस्वाद्यमानता भाषांतरित कलाकृतीमध्ये आणावयाची असते. त्यामुळे भाषांतरकारामध्ये एका लेखकाच्या कुवतीशिवाय आणखी बऱ्याच गुणांची अपेक्षा करावी लागते. उत्तम भाषांतरकार हा खोल बुद्धीचा रसिक असल्याशिवाय त्याला मूळ वाङ्मयीन कृतीचे नीट आकलनच होणार नाही. विशिष्ट वाङ्मयीन कृतीचे सौंदर्य किंवा आस्वाद्यमानता नेमकी कोणत्या घटकांत आहे, हे कळल्याशिवाय आपल्या भाषांतरित कलाकृतीत ते घटक त्याला बरोबर जोपासता येणार नाहीत. त्यामुळे भाषांतरमीमांसेत भाषांतरकाराच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचा, त्याच्या प्रेरणांचा, त्याच्या आकलनाचा, दोन्ही भाषांच्या ज्ञानाचा आणि भाषांतर-कौशल्याचा विचार अपरिहार्य ठरतो.

अनेक प्रकारच्या ग्रंथांची भाषांतरे सातत्याने होत असली, तरी ह्या भाषांतराचे स्वरूप मूलत:च सारखे किंवा सारख्या योग्यतेचे राहू शकणार नाही. सामान्यत: आपल्याला या भाषांतराचे दोन भागात विभाजन करता येणे शक्य आहे. (१) शास्त्रीय ग्रंथांचे भाषांतर (२) ललित ग्रंथांचे भाषांतर.

एका भाषेतील ग्रंथाचे दुसऱ्या भाषेतील ग्रंथात भाषांतर करीत असताना त्या ग्रंथातील आशय जसाचा तसा अर्थात मुळाबरहुकूम यावा, ही सर्वसामान्य अपेक्षा असते. शास्त्रीय ग्रंथांच्या भाषांतरात भाषांतरकार यशस्वी होण्याची शक्यता पुष्कळच असते, ह्याचे मूलकारण भाषांतरकाराचे भाषांतर करण्याचे कसब नसून शास्त्रीय ग्रंथाचे स्वरूप हे होय. शास्त्रीय ग्रंथ मुळातच ज्ञानप्रसाराच्या उद्देशाने लिहिलेले असतात. ललितग्रंथांच्या निर्मितीच्या प्रयोजनापेक्षा त्यांची प्रयोजने मुळातच भिन्न असतात. भाषा सोपी, अर्थप्रवाही कशी होईल ह्याची काळजी शास्त्रीय स्वरूपाच्या ग्रंथांमध्ये घेतलेली असते. शब्दाच्या तीन शक्तींपैकी अभिधा ह्या शक्तीचाच वापर अशा ग्रंथात केलेला असल्यामुळे भाषांतरकाराचे काम तुलनेने सोपे असते.

ललित वाङ्‌मयीन कृतीत मात्र लक्षणा आणि व्यंजना ह्या शक्ती कार्यरत होतात. विशेषत: काव्यात तर ह्याचा प्रत्यय विशेषत्वाने येतो. त्यामुळेच ललित वाङ्‌मयीन कृतीचे मुळाबरहुकूम भाषांतर ही एक अशक्य गोष्ट आहे, असे मानण्याकडे अनेकांचा कल असतो. त्यात अजिबात तथ्य नसते असे नाही; पण ललितकृतीचे अगदी यथातथ्य भाषांतर ही अपेक्षाच मुळात अनाठायी स्वरूपाची असते. विजय तेंडुलकरांनी टेनेसी विल्यम्सच्या 'अ स्ट्रीटकार नेम डिझायर'चा 'वासनाचक्र' हा मराठी अनुवाद केला. तो करीत असताना झालेल्या गोचीबद्दल तेंडुलकर लिहितात, ''चांगलं भाषांतर हे स्वतंत्र लेखनापेक्षा किती अवघड आहे, हे 'स्ट्रीटकार'ने दाखवून दिले. वर्षभर खपूनही शेवटी जे भाषांतर प्रसिद्ध झालं त्यानं माझं समाधान नव्हतं. उत्तम संवाद शब्दश: भाषांतरात पकडता घेत नाहीत आणि मूळ संवादातील लय भाषांतरित संवादांत उतरवताना जीव जातो. संवाद म्हणजे एकेक वाक्य नव्हे. अनेक वाक्ये, काही नि:शब्द जागा आणि या सर्वांतून धावणारी अर्थाची आणि नादाची सुरेख लय यांचा उत्स्फूर्त आणि एकजीव मेळ म्हणजे चांगला संवाद. शब्दश: भाषांतरात बाकी सर्व हरवतं आणि ते पकडू जावं तर शब्द हरवतात.''[१] यावरूनच ललितकृतीचे भाषांतर करणे ही तरबेज लेखकासाठी देखील किती अवघड गोष्ट आहे, हे आपल्या लक्षात येईल.

**ललित वाङ्‌मयाचे भाषांतर - काही अडचणी :**

(१) मूळ भाषा आणि लक्ष्य भाषा ह्यांच्यातील चिन्हव्यवस्था सारखीच नसते. प्रत्येक भाषा आपली चिन्हव्यवस्था स्वतंत्ररीतीने तयार करते. ती भाषा ज्या भाषकसमूहाची असते त्याच्या सापेक्षतेने निर्माण झाली असते. त्यामुळे मूळ

भाषेतील चिन्हव्यवस्था लक्ष्यभाषेत जशीच्या तशी नसेल, तर भाषांतरात अडचणी निर्माण होणारच. मराठीतील मामा किंवा काकासाठी इंग्रजीत अंकल हा एकच शब्द वापरण्यात येतो. मराठीत तो विशिष्ट शब्द वापरल्याने जो अर्थ नेमकेपणाने प्रकट करावयाचा आहे त्याचे भाषांतर करताना स्पष्टीकरणात्मक शब्दसमूह वापरावा लागेल. अशा अवस्थेत भाषांतर पसरट होण्याची शक्यता असते.

( २ ) दोन वेगळ्या भाषांतील समानार्थी शब्दांचे लिंग वेगळे असेल तर विशिष्ट अर्थ-प्रत्ययात बाधा निर्माण होते. त्यामुळे अचूकता कमी होण्याची शक्यता असते.

( ३ ) मूळ भाषा आणि लक्ष्य भाषा ह्या कोणत्या आहेत यावरही अडचणींचे स्वरूप अवलंबून असते. सामान्यतः मूळ भाषा आणि लक्ष्य भाषा या सहोदर भाषा एकाच कुलातील असतील तर भाषांतर सहज करता येते. उदा० हिंदीतून मराठीत भाषांतर. एकाच देशातील भाषा भौगोलिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या जवळच्या असतील तर तुलनेने भाषांतर सहज करता येते. पण या दृष्टीने त्या दूरच्या असतील तर चिन्हव्यवस्था, घडण, सांस्कृतिक प्रतीके ह्यांत इतकी भिन्नता असते, की भाषांतरकारासाठी ती तारेवरची कसरतच होते. कितीही प्रयत्न केला तरी मूळ भाषेतील अर्थ लक्ष्य भाषेत आणता येत नाही.

( ४ ) ललित कृतीतील भाषा ही केवळ प्रमाणभाषा नसते. प्रदेश, संस्कृती, चालीरीती ह्यामुळे तिचे स्वरूप फार लवचीक आणि नित्यनूतन असते, विकासोन्मुख आणि प्रवाही असते. मूळ लेखकाने त्या त्या परिस्थितीत विशिष्ट मानसिक अवस्थेत त्या भाषेचा प्रयोग आपली वाङ्मयीन कृती सिद्ध करताना केलेला असतो. त्या भाषेतील शब्दांना अनेक अर्थ चिकटलेले असतात. त्यातील कोणत्या अर्थाने त्याने शब्द प्रयुक्त केला आहे, हे नीट न कळल्यास भाषांतरकारासमोर अनेक अडचणी निर्माण होतात.

**अचूक आणि दर्जेदार भाषांतरासाठी पथ्ये :**

( १ ) भाषांतरकाराला मूळ भाषेचे आणि लक्ष्य भाषेचे अतिशय उत्तम ज्ञान असले पाहिजे. तथापि मूळ भाषेतील मजकूर भाषांतरकाराला नीट समजून घ्यावयाचा असतो. त्या भाषेत त्याला निर्मिती करायची नसते; पण लक्ष्य भाषेत भाषांतर करावयाचे असल्यामुळे लक्ष्य भाषेत लेखन करण्यावर त्याचे प्रभुत्व असले पाहिजे.

( २ ) मुळातील अर्थ नीट समजणे ह्याला फार महत्त्व आहे. विशेषतः ललित कृतीची अनेकार्थक्षमता पाहता तो अर्थ समजण्यासाठी भाषा आणि साहित्यकृती ह्यांची विशेष जाण असणे आवश्यक आहे. त्या त्या कलाकृतीचे वैचारिक, भावनिक, बौद्धिक, संवेदनानिष्ठ आकलन त्याला झाले पाहिजे; इतकेच काय त्या कलाकृतीचा घाट आणि शैली ह्यांचे देखील संपूर्ण आकलन त्याला झाले पाहिजे.

( ३ ) शब्दाला प्रतिशब्द या रीतीने शास्त्रीय ग्रंथाचे भाषांतर होऊ शकेल. परंतु ललित वाङ्मयीन कृतीचे होऊ शकणार नाही. म्हणून एकूण अर्थाकडे भाषांतरकाराने लक्ष देणे आवश्यक आहे. तो अर्थ भाषांतरात अवश्यमेव उतरलाच पाहिजे.

( ४ ) भाषांतर म्हणजे रूपांतर नव्हे. एरवी मूळ भाषेतील कृतीत ध्वनित झालेला अर्थ भाषांतरात फारसा येणार नाही व भाषांतराचा मूळ उद्देश विफल होईल. कधी कधी रूपांतर आणि स्वैर रूपांतर ह्यांचे मूळ कलाकृतीपासून दूर जाणे इतके उद्वेगजनक असते की त्यातून मूळ कलाकृतीविषयी वाचकाचा गैरसमज व्हावा! मॅथ्यू अरनॉल्डचे 'भाषांतराच्या द्वारे भाषांतरकाराने लक्ष्य भाषेतील वाचकाला मूळ भाषेपाशी आणायचे असते'[२] हे मत किंवा लॉंगफेलोचे, 'भाषांतरकाराने मूळ साहित्यकृतीत व्यक्त झालेल्या सत्याशी प्रामाणिक राहिले पाहिजे'[३] हे मत ह्या दृष्टीने विचारार्ह आहे.

**भाषांतरामागील प्रेरणा :**

भाषांतराच्या प्रेरणांवरही भाषांतराचे बरेचसे यश अवलंबून असते. या प्रेरणा प्रत्येक वेळी स्वयंप्रेरणा असतीलच असे नाही. ग्रंथव्यवहारात पुष्कळदा प्रकाशक उत्तम ग्रंथाचे भाषांतर करून घेऊन त्यावर चांगला व्यवसाय करतात. सध्या तर अशा धंदेवाईक भाषांतरकारांना बऱ्यापैकी काम उपलब्ध झाले आहे व त्यात गैर काही नाही, तथापि अशा भाषांतरकारांनी किमान आपल्या अभिरुचीशी आणि क्षमतेशी संवादी असणारा ग्रंथ भाषांतरासाठी निवडला पाहिजे, असे वाटते.

जे हौशी भाषांतरकार असतात त्यांच्या प्रेरणा यापेक्षा भिन्न असतात. इतर भाषेतील जी ललितकृती आपल्याला नितांत आवडली, तिचे भाषांतर करणे ही त्यांची एक निकडच होऊन बसते. त्या कलाकृतीभोवती त्यांचे मन सदैव रुंजी घालत असते. अशावेळी होणारे तादात्म्यही विलक्षण असते. अशा तादात्म्यातून चांगली भाषांतरे निर्माण होतात. तथापि उत्तम भाषांतराची हीच केवळ पूर्वअट नाही, हेही इथे नमूद करणे आवश्यक आहे.

**भाषांतर : शास्त्र की कला?**

उत्तम भाषांतर करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या पूर्वअटी, त्यातील अडचणी, अडचणींवर मात करण्यासाठी आवश्यक ते उपाय ह्यांचा विचार करता 'भाषांतर हे शास्त्र आहे की कला?' असा प्रश्न उपस्थित होणे शक्य आहे. त्याला उत्तर देताना कल्याण काळे ह्यांनी, ''भाषांतरमीमांसेला शास्त्र म्हणता येणार नाही.''[४] असा निर्वाळा दिला असला, तरी तो अपर्याप्त आहे. ह्याचे मूळ कारण ह्या प्रश्नाच्या दोन्ही बाजूंत आहे. हा प्रश्न उपस्थित होतानाच त्याचे शास्त्र किंवा तंत्र असले पाहिजे, ही गोष्ट अगदी उघडच





अनुक्रमणिका

आहे. ज्या विविध पद्धतीने वेगवेगळ्या मजकुराचे भाषांतर आज जगभर सुरू आहे त्यातून ही केवळ सर्जक कला आहे, असे म्हणता येणार नाही. ते शास्त्र किंवा तंत्र आहे इतकेच नव्हे तर शास्त्र, तंत्र आणि कला ह्यांचा मनोहर मेळ भाषांतरात दिसून येतो असे म्हणावे लागेल. शास्त्र किंवा तंत्र म्हणून आपण भाषांतरक्रियेचा स्वीकार केला, तर ते तंत्र आपल्याला अधिकाधिक विकसित करता येईल. सामान्यत: कलेच्या निर्मितीसंबंधी रूढार्थाने कार्यशाळा आयोजित करता येत नाही. पण तंत्राच्या विकासासाठी कार्यशाळा आयोजित करता येतात. ही कार्यशाळा देखील ह्या दृष्टीने अनुमोदन देईल, असे मला वाटते. तंत्र आणि कला ह्यात विरोध नसतो. भाषांतरकार दोन्ही भाषांवरील प्रभुत्वानुसार जमेल तसे भाषांतर करीत असतो, हे खरे असले तरी भाषांतराचे शास्त्र आणि तंत्र विकसित झाल्यास भाषांतराच्या विश्वव्यापी कार्याच्या प्रयोजनपूर्तीसाठी आपण चार पावले पुढे जाऊ शकू. भाषांतराचे शास्त्र म्हणजे चार ढोबळ आडाखे नव्हे, तर ती एक सूक्ष्म ज्ञानमीमांसा आहे, हे आपण लक्षात घेतले पाहिजे, असे मला वाटते.

सातत्याने होत असलेल्या भाषांतरामुळे विश्वातील ज्ञान लक्ष्य भाषांमध्ये येऊन त्यांची समृद्धी वाढते. त्यामुळे या भाषांतरप्रवृत्तीला उत्तेजन दिले पाहिजे. मराठीच्या दृष्टीने पाहिल्यास इंग्रजीतून मराठीत किंवा हिंदीतून मराठीत शास्त्रीय आणि ललित ग्रंथांची भाषांतरे पुष्कळ प्रमाणात झाली आहेत व सातत्याने त्यांची संख्या वाढते आहे. त्यामुळे स्वभाषेचा मोठ्या प्रमाणावर फायदा होत आहे. तिची संपन्नता, तिच्यातील शब्दसंग्रह वाढतो आहे. जिथे अनुवाद करणे शक्यच नसते असे शब्द लक्ष्य भाषेत येतात व पुष्कळदा ते रूढ होतात. या योगाने शब्दसंग्रह वाढतो. विश्वातील अपरिचित ज्ञान आपल्या भाषेत घेऊन लोकांचा ज्ञानविकास होतो. विशेषत: शास्त्रीय ग्रंथांच्या भाषांतरामुळे झालेल्या विकासाचे प्रत्यक्ष रूप आपण अनुभवत आहोतच.

**भाषांतरप्रवृत्तीतील धोके :**

ह्या सर्व बाबी महत्त्वाच्या असल्या, तरी ह्यात एक मोठा धोकाही संभवतो. तो अर्थातच ललितकृतींच्या निर्मितीसंबंधी आहे. तो असा की भाषांतराची प्रवृत्ती वाढली की लेखकाची स्वत:च्या सर्जनाची प्रवृत्ती मंदावते. 'चांगले भाषांतर करण्यापेक्षा भिकार निर्मिती करणेच सर्वत्र महत्त्वाचे ठरते.'[५] असा टोमणा भालचंद्र नेमाडे ह्यांनी टुकार लेखकांना मारला आहे. अर्थात त्यातील गर्भितार्थ हा की अशी भिकार निर्मिती करण्यापेक्षा लेखकांनी चांगल्या कलाकृतींची भाषांतरे केलीत तर ती अधिक फलदायी होतील! तथापि अशा वाढत्या प्रवृत्तीत पुष्कळदा चांगल्या लेखकाचाही बळी जातो. चंद्रकांत पाटलांनी असे नमूद केले आहे की, 'अनुवादाच्या कार्यात मी इतका बुडून गेलो, की त्यानं माझी कविताच बुडवून टाकली.'[६] तेव्हा हा धोकाही लेखकांनी वेळीच ओळखला पाहिजे.

याशिवाय वाचकांच्या आस्वादप्रक्रियेवर देखील भाषांतरित कलाकृतीच्या आस्वादाचा परिणाम होतो. अनुवादित कलाकृतींच्या माध्यमातून जगातील उत्तमोत्तम कलाकृतींचा आस्वाद घेण्याची सवय वाढत गेल्याने स्वभाषेतील कलाकृतीविषयी फारसे अगत्य उरत नाही. आपली कलाकृती आस्वादण्यासाठी रसिक नाहीत ह्या जाणिवेचा इतर लेखकांच्या निर्मितिप्रक्रियेवर देखील प्रतिकूल परिणाम होतो. अर्थात ह्याचा दोष भाषांतराच्या प्रवृत्तीकडे किंवा त्या कार्याकडे जात नाही. उलट मोठे वैश्विक आवाहन मिळून आपले लेखक अधिक सजगतेने लिहू लागतील, असा आशावाद बाळगायला देखील हरकत नाही. कारण शेवटी आपले लेखकदेखील वाचक असतातच. विश्वातील लेखनाचा स्तर त्यांना या पद्धतीने का होईना कळल्यास, आपल्याला आपली उंची कशी वाढवता येईल ह्याचा त्यांना अदमास येऊ शकेल.

इथे आणखी एक गोष्ट नमूद करणे मला आवश्यक वाटते ती ही की, भिकार ललितकृती निर्माण करण्यापेक्षा चांगली भाषांतरित ललित कृती निर्माण करणे अधिक श्रेयस्कर असले, तरी स्वतंत्र साहित्यनिर्मिती करणाऱ्यांना आज ती प्रतिष्ठा आहे ती अद्यापही अनुवादकर्त्यांना नाही. ज्यांना स्वतंत्र साहित्यनिर्मिती जमत नाही ते अुनवादाकडे वळतात, असा सार्वत्रिक समज आहे. तथापि असा समज करून घेणे ही दुर्दैवाची गोष्ट आहे. भाषांतर हे एका परीने पुनर्सर्जन आहे. त्यासाठी स्वीकृत कार्याबद्दल निष्ठा, तादात्म्य आणि प्रतिसर्जनाचे कौशल्य इत्यादी गुणांची आवश्यकता असते. भाषांतरित साहित्यनिर्मिती ही वाङ्मयीन जगतासाठी अत्यंत उपकारक गोष्ट आहे, हे जसजसा आपला समाज समजून घेईल, व भाषांतकारदेखील आत्मसन्मुख होऊन, आपली जबाबदारी ओळखून भाषांतरे करतील, तसतशी त्यांना आणि भाषांतरांना निश्चितच प्रतिष्ठा प्राप्त होणार आहे.

**समारोप :**

इंग्रजीतून मराठीत अनुवाद करण्याची परंपरा किमान दोनशे-अडीचशे वर्षांची तरी असावी. तथापि मराठी भाषा, वाङ्मय, लौकिक व्यवहार, शास्त्रे आणि एकूण ज्ञान ह्यांच्या विकासाकरिता आजही जितक्या प्रचंड प्रमाणात सर्व प्रकारच्या भाषांतरांची आवश्यकता आहे तेवढ्या प्रमाणात ते काम झालेले नाही. 'वाङ्मयीन महात्मता' हा दीर्घनिबंध लिहिताना, 'मराठी वाङ्मय इतके परपुष्ट आहे की ते पुरेसे परपुष्ट नाही. म्हणजे ते एकांगीपणे परपुष्ट आहे.' अशी खंत बी०सी० मर्ढेकरांनी प्रकट केली आहे. ती खंत निघून जावी आणि प्रचंड प्रमाणात हे कार्य व्हावे, त्याचप्रमाणे एकांगीपणे परपुष्ट होण्याच्या आरोपाचे निराकरण होण्याकरिता आणि जागतिकीकरण अधिक सार्थ होण्याकरिता इतर भाषांतूनही मराठीत मोठ्या प्रमाणावर अनुवाद व्हावे, असे मला प्रामाणिकपणे वाटते.

**संदर्भ :**

( १ ) विजय तेंडुलकर नाटक आणि मी. १९९७. पृ० १८३-१८४, 'अनुवादमीमांसा' संपादक केशव तुपे, औरंगाबाद. २०१२ या ग्रंथातून उद्‌धृत, पृ० १८७.

( २ ) 'भाषांतरमीमांसा', संपा० कल्याण काळे, अंजली सोमण, प्रतिमा प्रकाशन, पुणे, १९९७, पृ० ४८.

( ३ ) तत्रैव.

( ४ ) कल्याण काळे, 'भाषांतरमीमांसा', तत्रैव, पृ० ३२.

( ५ ) भालचंद्र नेमाडे, भाषांतर मीमांसेचे स्वरूप, 'अनुवादमीमांसा', उनि पृ० २०.

( ६ ) चंद्रकांत पाटील, चंद्रकांत पाटील ह्यांची मुलाखत, 'अनुवादमीमांसा', उनि पृ० २२८.

[*भारतीय भाषा संस्थान, ज्ञानगंगोत्री, मैसूर (राष्ट्रीय अनुवाद मिशन) आणि वसंतराव नाईक शासकीय कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर ह्यांनी आयोजिलेल्या त्रिदिवसीय उद्‌बोधन कार्यक्रमाच्या उद्‌घाटनप्रसंगी दिलेले बीजभाषण दि० २९-०१-२०१३*] ■

### भाषा-अस्त्र

समूहांचे ब्रेनवॉशिंग करण्याचे प्रमुख अस्त्र म्हणजे कल्चरल डिप्लोमसी. त्याची सुरुवात भाषेच्या प्रसारापासून होते. कारण शेवटी प्रत्येक संस्कृती अमुक एका भाषेतून विचार करत असते. ती भाषा इतर समूहांना गोड वाटली, आवडू लागली की, त्यातले आचार-विचार-संस्कारही आवडू लागतात. मग स्वत:ची मातृभाषा तोकडी वाटू लागते. स्वत:ची संस्कृती तोकडी वाटू लागते. इंग्रजांनी फार पूर्वीपासून ही काळजी घेतली. रशिया, फ्रान्स, जर्मनी, जपान या देशांनी इंग्रजांचा कित्ता गिरवला. या क्लबात आता चीन दाखल झाला आहे. २०२०पर्यंत जगभरात चिनी भाषा आणि चिनी कल्चरचा प्रसार करणाऱ्या तब्बल १००० कन्फ्युशिअस इन्स्टिट्यूट्स उभारण्याचा विडा या देशाने उचलला आहे. पैकी ५०० इन्स्टिट्यूट कार्यरतही झाल्या आहेत. प्रत्येक इन्स्टिट्यूटपाठी प्रतिवर्षी तब्बल ४ लाख डॉलर्स खर्च केले जातात.

आंतरराष्ट्रीय मुत्सद्देगिरीच्या प्रांगणात याला 'सॉफ्ट पॉवर' असे नाव आहे. ही सॉफ्टपॉवर वाढवण्याचे अनेक मार्ग असतात. त्यातला सर्वात प्रभावी मार्ग म्हणजे आपल्या भाषेचे सबलीकरण करणे. आणि मग ही सबला दूर दूर देशी पाठवून आपल्या संस्कृतीचे सबलीकरण करणे.

**वैशाली करमरकर**, लोकरंग, 'लोकसत्ता' ९ जून २०१३

# मराठी भाषा आणि तिचा भाषिक समाज

नंदकुमार मोरे

मराठी भाषेला आजचे रूप प्राप्त होण्यासाठी अनेक परिवर्तनातून संक्रमण करावे लागले आहे. अनेक भाषा आणि संस्कृती यांचे ऋण घेऊनच तिला आजचे सामर्थ्य प्राप्त झालेले आहे. महाराष्ट्रासारख्या भौगोलिक दृष्टीने विस्तृत भूमीवर आणि महाराष्ट्राबाहेरही ती मोठ्या प्रमाणावर नित्य व्यवहारासाठी वापरली जाते. भारतीय स्वातंत्र्यानंतर इतर राज्यभाषांच्या बरोबरीने मराठी भाषेलाही राजभाषा म्हणून मान्यता देण्यात आली. या भूमीवरील तिचे सर्वव्यापक अस्तित्व ध्यानात घेता हा मान मिळणे हा मराठीचा अधिकारच होता. महानुभावांपासून विष्णुशास्त्री चिपळूणकरांपर्यंत अनेक मान्यवरांनी तिची वाङ्मयीन महत्ता सिद्ध केलेली आहे.

मराठी भाषेचे प्रमाणभाषा म्हणून जे रूप ओळखले जाते; ती मूळची पुणेरी बोली होय. सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक आणि राजकीय वर्चस्वामुळे ही बोली 'प्रमाणभाषा' या मान्यतेपर्यंत पोहोचली. महाराष्ट्र हे बहुसंख्येने मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांचे राज्य आहे. भौगोलिक दृष्टीने या राज्याचे कोकण, मराठवाडा, खानदेश, विदर्भ आणि पश्चिम महाराष्ट्र अस ढोबळपणे विभाग मानले जातात. मराठी भाषा असे म्हणताच आपल्यासमोर जे रूप येते, ते मराठीचे 'प्रमाण' म्हणून मान्यता मिळालेले रूप होय. तथापि संपूर्ण महाराष्ट्रामध्ये व्यवहारात सर्वत्र हे रूप वापरले जात नाही. वास्तविक भाषेचे प्रमाण रूप केवळ व्यापक व्यवहार म्हणजेच शासकीय आणि कार्यालयीन कामकाज, लेखन, प्रकाशन आणि इतर माध्यमांमध्ये वापरले जाते. दैनंदिन व्यवहारात अस्तित्व असते ते तिच्या बोलींचे. महाराष्ट्राच्या विस्तृत भूमीवर मराठीची अनेक बोलीरूपे अस्तित्वात आहेत. त्याचबरोबर एका विशिष्ट प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या बोलींमध्येही त्या प्रदेशातील सामाजिक-भौगोलिक वैशिष्ट्यांनुसार विविध भेद आढळतात. यापुढे जाऊन बोलीचा सूक्ष्म विचार केल्यास बोलीरूप व्यक्तिगणिक भिन्न असल्याचे दिसून येते.

मराठी भाषेची प्रमाणभाषा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या रूपाची लिपी आणि सत्तर टक्के शब्द संस्कृत भाषेपासून उत्क्रांत झालेल्या भाषांच्या परंपरेतील आहेत हे अभ्यासकांनी दाखवून दिले आहे. इंग्रजीसारख्या परकीय भाषेसह कन्नड, तमीळ, तेलुगु या द्रविडी, तर वेळोवेळी झालेल्या स्वाऱ्यांमुळे फार्सी, उर्दू आणि शेजारी राज्यातील हिंदी, गुजराती या भाषांतून शब्दांच्या बाबतीत मराठी भाषेने मुक्त हस्ते ऋण घेतलेले आहे. मराठीच्या

प्रांत, जाती, धर्म, व्यवसायानुसार अनेक बोली पाहायला मिळतात. शास्त्रीय दृष्टीने त्यांना स्वतंत्र बोली मानून त्या प्रत्येक बोलीचा स्वतंत्र विचार होऊ शकतो. मराठीच्या विविध बोलींना अभ्यासकांनी अभ्यासाच्या किंवा संशोधनाच्या सुलभीकरणासाठी जाती, धर्म, व्यवसाय, स्थळ यानुसार नावे दिलेली दिसतात.

प्रमाणभाषा ही कधीकाळी बोलीच असते. मराठी भाषेची 'कोकणी' ही बोली आज साहित्य अकादमीने स्वतंत्र भाषा म्हणून मान्य केली आहे. कोकणी, अहिराणी, वऱ्हाडीसारख्या मराठीच्या प्रमुख बोलींच्याही अनेक उपबोली आहेत. एखाद्या भाषेच्या बोलींचा अभ्यास हे अभ्यासकांसमोरील आव्हान असते. बोली निर्माण होण्याची कारणे अनेक असतात. एखाद्या प्रमाणभाषेच्या कितीही बोली असल्या तरी तिच्या सर्व बोली त्या प्रमाणभाषेला नवनव्या शब्दांचे भांडार पुरवीत असतात. बोली ही प्रमाणभाषेपेक्षा अधिक परिवर्तनशील असते. समाजातील बदल ती नैसर्गिकपणे स्वीकारते. महाराष्ट्रभर असलेल्या मराठीच्या अनेक बोलींपैकी अनेक बोलींचा अभ्यास झालेला आहे. तर काही बोली अभ्यासाच्या प्रतीक्षेत आहेत.

**मराठी भाषिक समाज**

महाराष्ट्र हा मराठी भाषिकांचा प्रदेश म्हणून ओळखला जातो. याचा अर्थ मराठी भाषा बोलणाऱ्यांव्यतिरिक्त महाराष्ट्रामध्ये कोणी राहात नाही असा नाही. महाराष्ट्रामध्येही मराठीशिवाय अनेक भाषा बोलणारे लोक आहेत. अनेक परभाषिक समूह महाराष्ट्रामध्ये कायमस्वरूपी स्थायिक झाले आहेत. तथापि असे म्हणता येईल की, महाराष्ट्रामध्ये बहुसंख्य लोकांची मातृभाषा मराठी आहे. शिवाय गोवा, कर्नाटक, गुजरात, मध्यप्रदेश, आंध्रप्रदेश, तामिळनाडू इत्यादी राज्यांमधून त्याचबरोबर मॉरिशस, अमेरिकासारख्या विदेशांमध्ये स्थिरस्थावर असलेला मराठी समाजही देखील कित्येक शतकांपूर्वीपासूनची मराठी भाषिकांची सांस्कृतिक केंद्रे आहेत. मराठी भाषा बोलणारे समूह मातृभाषा म्हणून मराठी भाषा आणि संस्कृतीचे वर्षानुवर्षे जतन करताना दिसतात.

मात्र उपरोल्लिखित सर्व मराठी भाषिकांच्या समूहाला 'मराठी भाषिक समाज' म्हणणे अशक्य आहे. भाषिक समाजाची संकल्पना यापेक्षा व्यापक आहे. विशिष्ट भाषिक समाज ठरवणे हे समाजभाषाविज्ञानाचे उद्दिष्ट आहे. त्यानुसार अनेक अभ्यासकांनी भाषिक समाजाची संकल्पना आणि उदाहरणे दिलेली आहेत. डॉ० रमेश वरखेडे यांनी, 'ज्या समाजात भाषिक प्रयोग आणि भाषा आकलन यात सुसंवादित्व व परस्परमेळ असतो त्या समाजाला 'भाषिक समाज'(Speech Community) म्हणतात.' (रमेश वरखेडे, २००१ : ४२) असे म्हटले आहे. तर या संकल्पनेपेक्षा थोडी विस्तारित संकल्पना डॉ० लीला गोविलकर यांनी सांगितली आहे. 'मराठी समाज, असे जेव्हा आपण म्हणतो; तेव्हा संज्ञापनासाठी मराठीचा उपयोग करणारा सर्व जातिजमातींचा समुदाय, महाराष्ट्राच्या

कानाकोपऱ्यातून पसरलेला छोटा-मोठा, प्रादेशिक, व्यावसायिक समाजगट हा मराठी समाज म्हणून समजावा लागतो. याशिवाय मराठी मातृभाषा असणारा, मग तो प्रत्यक्ष महाराष्ट्रात असो किंवा व्यवसाय शिक्षणाच्या निमित्ताने जगाच्या पाठीवर कुठेही वावरत असो, तो मराठी भाषक समाज म्हणून ओळखला जातो. व्यवसाय-शिक्षणादीच्या निमित्ताने, ज्याला महाराष्ट्रात राहावे लागल्याने, मराठी या प्रादेशिक भाषेचा स्वीकार करावा लागला आहे. अशा माणसांचा समाजही मराठी समजावा लागतो. मातृभाषा मराठी असलेल्या व महाराष्ट्रात राहणाऱ्या समाजावर हिंदी, गुजराती, पंजाबी, इंग्रजी, कन्नड इत्यादी भाषातील संज्ञापनाचाही परिणाम होत असतो. त्यामुळे असा प्रभावित व संकरित समाजही या संकल्पनेत समाविष्ट होतो.' (पाटणकर जयश्री (संपा०), २००५ : ६७) या विचारापेक्षा वेगळा विचार डॉ० रमेश धोंगडे मांडतात. ते लिहितात, 'भाषेवरून भाषिक समाज ठरवणे व समाजावरून भाषा ठरवणे यात गोल गोल फिरण्याचा दोष आहे.' (रमेश धोंगडे, २००६ : ९) हे मत अभ्यासकांना विचारप्रवृत्त करणारे आहे. कारण कोणतीही भाषा व्यक्ती वापरीत असते; समाज नव्हे. आणि एका व्यक्तीप्रमाणे दुसरी व्यक्ती भाषा वापरत नाही. अशा एका भाषेपासून भिन्न भाषा वापरणाऱ्या व्यक्तींना एकाच भाषिक समाजामध्ये समाविष्ट करणे अशास्त्रीय आहे. डॉ० धोंगडे हे मराठी भाषिक समाजाविषयी पुढे तीन मुद्यांमध्ये विस्ताराने लिहितात,

(१) 'प्रत्येक भाषेला एक भाषिक समाज असतो. या भाषिक समाजातले लोक प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे त्या समाजभाषेद्वारे संपर्क साधतात.

'या दृष्टिकोनामध्ये समान भाषेद्वारे संपर्क साधणे हे महत्त्वाचे आहे. पुणे, नागपूर, कोल्हापूर, नाशिक, बेळगाव, नांदेड, औरंगाबाद, मुंबई, रत्नागिरी वगैरे ठिकाणचे लोक एकमेकांशी प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे मराठीमध्ये संपर्क साधतात म्हणून ते एका मराठी भाषिक समाजात मोडतात. पण तंजावरमधल्या मराठी भाषकांच्या या लोकांशी संपर्क नसेल तर ते या समाजाचे घटक होत नाहीत. अहमदाबादमध्ये स्थायिक झालेल्या मराठी भाषकांचा या समाजाशी संपर्क नसेल, तर तेही या समाजाचे घटक होत नाहीत. उलट पुण्या-मुंबईच्या कुटुंबातील अनेक तरुण-तरुणी अमेरिका, इंग्लंड, ऑस्ट्रेलिया, कॅनडा, दुबई, मस्कत येथे स्थायिक झाले असूनही त्यांचा संपर्क महाराष्ट्रातील त्यांच्या कुटुंबाशी, नातेवाईकांशी, मित्र-मैत्रिणींशी आहे. म्हणून त्यांना मराठी भाषिक समाजाचे घटक मानावे लागेल.

'(२) एक भाषा किंवा अनेक भाषा वापरणारे लोक जर एकमेकांशी सतत संपर्कात असतील तर तो समाजही भाषिक समाज मानावा लागेल.

'या दृष्टिकोनात समान भाषेचा आग्रह नाही. मात्र एकमेकांशी नित्य व्यवहार असल्याचा आग्रह आहे. मुंबईमध्ये गुजराती भाषक, मराठी भाषक, हिंदी भाषक, तमीळ

आणि मल्याळी भाषक एकमेकांशी देवाणघेवाण करीत असतात. या सर्वांना एकाच भाषिक समाजाचे घटक मानावे लागेल. त्यांना फारतर मराठी भाषिक समाज असे म्हणता येणार नाही, पण त्यांना मुंबईचा भाषिक समाज असे म्हणता येईल.

'(३) भाषिक समाजाला एक भाषा असणे आवश्यक नाही. सामाजिक व्यवहारात समान मानकांचा वापर, समान सामाजिक औचित्याच्या कल्पना, ज्ञानाची समान क्षेत्रे, जगाविषयी समान दृष्टिकोन आणि समान संभाषण पद्धती यावरून भाषिक समाज ठरतो.'(रमेश धोंगडे, २००६ : १४)

डॉ० धोंगडे यांनी मराठी भाषिक समाजाविषयीची मांडलेली संकल्पना योग्य वाटते. या संदर्भानेच डॉ० वरखेडे यांनी सांगितलेला समाजातील भाषिक प्रयोग आणि भाषाआकलन यामधील सुसंवादित्व आणि परस्परमेळ हा मुद्दा डॉ० धोंगडे यांच्या विवेचनाला पुष्टी देणारा आहे. कारण केवळ व्यक्तींच्या समूहाला आपण समाज म्हणत नाही. एकसारख्या दिसणाऱ्या व्यक्तींचा एक समाज आपण ठरवत नाही. तर त्या व्यक्तींच्यामध्ये असणारा परस्परसंबंध आपण तपासून त्यांना एका समाजाचे घटक ठरवतो. या विचाराने डॉ० धोंगडे यांनी सांगितलेले मराठी भाषिक समाजाचे घटक रास्तच आहेत.

मराठी भाषिक समाज कोणत्या समाजाला म्हणावयाचे हे निश्चित केल्यानंतर आपण मराठी भाषिक समाजाची व्याप्ती आणि स्वरूपासंबंधी थोडी चर्चा करू. डॉ० धोंगडे यांचे मराठी भाषिक समाजाचे घटक विचारात घेतले तरी, मराठी भाषिक समाजाची व्याप्ती कमी न होता ती विस्तारतानाच दिसते. महाराष्ट्रासह बृहन्महाराष्ट्रातील मराठी भाषिक समाजाच्या अभ्यासासाठी या समाजाची भौगोलिक, सांस्कृतिक, सामाजिक, राजकीय व ऐतिहासिक पार्श्वभूमीही विचारात घ्यायला हवी. मराठी भाषा बोलल्या जाणाऱ्या विविध प्रदेशांमध्ये अनेक कारणांनी भाषेचे स्वरूप निरनिराळी रूपे घेताना दिसते. ही बोलीरूपे प्रमाण मराठीपेक्षा कितीतरी भिन्न-भिन्न रूपांत आढळतात. तंजावर, बडोदा यासारख्या ठिकाणी तर भाषा खूपच बदललेली आहे. बेळगावसारख्या ठिकाणी 'तरुण भारत' हे वर्तमानपत्र प्रमाण मराठीमधून प्रसिद्ध होते. परंतु तेथील मराठी समाज कानडी वळणाची मराठी बोलतो. बृहन्महाराष्ट्रातील विविध प्रदेशांतील मराठीचा अभ्यास हा स्वतंत्र संशोधनाचा विषय ठरावा, इतकी भाषिक विविधता तेथे आढळते. या संदर्भात गीता सप्रे यांचे तेथील मराठी भाषिकाचे निरीक्षण महत्त्वाचे आहे. त्यांच्या निरीक्षणावरून महाराष्ट्राबाहेरील मराठी भाषेची स्थिती सहज लक्षात येते. त्या लिहितात, 'मध्यप्रदेशातील मराठी भाषेचा आढावा घेतला, तर आपल्याला असं आढळून येईल की, मध्यप्रदेशाची मराठी बोलीभाषा अत्यंत बिघडलेली आहे. मध्यप्रदेशीय मराठी भाषेला महाराष्ट्रातले लोक 'खिचडी भाषा' म्हणून हसतात, नावं ठेवतात. जर शुद्ध भाषा हाच निकष लावायचा असं ठरवलं, तर मध्यप्रदेशातल्या कोणत्याच व्यक्तीची भाषा शुद्ध नसते हे कबूल.

मध्यप्रदेशीय मराठी माणूस 'आम्ही जाऊन राह्यलोय्', 'करून राह्यलोय', टाईप हिंदी वळणाचं मराठी बोलतो. पण कहर म्हणजे, अगदी नव्या पिढीला मराठी भाषा फारशी येतच नाही. आजकालच्या तरुण मुलांमुलींचं बोलणं ऐकलं तर ती भयंकर भाषा ऐकून पुणेरी लोकांना मूर्च्छा येईल.' (संपा० कल्याण काळे-मृणालिनी शहा, १९९८ : २१) या निरीक्षणातील विधानांना वैज्ञानिक दृष्टिकोनाचा अभाव असल्याचे वाटत असले तरी, या निरीक्षणामुळे भाषेच्या स्वरूपावर वास्तव प्रकाश पडतो. या निरीक्षणाबरोबर तेथील लोकांच्या बोलीची काही उदाहरणे लेखिका देते. ''मावशी मी सोचतच होते तुझ्याकडे येण्याचं'', ''बाबा मला पिटतील नं!'', ''अशेच सीधे जा अन् मग नुक्कडवर डाव्या गल्लीत मुरकून जा'' या बोलीरूपांवर असणारा हिंदीचा प्रभाव स्पष्ट दिसतो.

प्रमाण मराठीपासून भौगोलिकदृष्ट्या लांब पडलेले, भिन्न भाषिक प्रदेशामध्ये कायमस्वरूपी वास्तव असलेले किंवा स्थायिक झालेले लोक अशीच भाषा बोलणार; कारण आजूबाजूच्या परिसरामध्ये आणि त्यांच्या संपर्कामध्ये येणारे लोक भिन्नभाषिक असतात. त्यामुळे त्यांची भाषा ही सतत बदलतच राहणार. ही बदलाची प्रक्रिया नैसर्गिक आहे. अशा प्रदेशांमध्ये मराठी माध्यमाच्या शिक्षणाची सोय नसते. मराठी पुस्तकांची उपलब्धता नसते. मराठी वर्तमानपत्रे मिळत नाहीत. एकूणच त्यांना मराठी वातावरण मिळत नाही. महाराष्ट्रापासून लांब असलेल्या या समाजाला आजच्या स्पर्धात्मक युगामध्ये नोकरी-व्यवसायासाठी मराठी भाषेवर अवलंबून राहणे शक्य नाही. आज महाराष्ट्रातील पुणे, मुंबई, नागपूरसह बेळगाव, गोवा या ठिकाणीदेखील यापेक्षा वेगळी परिस्थिती नाही. व्यावसायिक गरज म्हणून आज बहुतांश मराठी भाषिक हिंदी-इंग्रजी माध्यमांतून शिक्षण घेतात. त्यामुळे मराठीचे रूप बदलत आहे. महाराष्ट्रातील मराठी भाषिकांसह या सर्व प्रदेशातील लोक वेगवेगळ्या कारणांनी परस्परांच्या संपर्कात असतात. या सर्वांमध्ये परस्परव्यवहार सुरू असतो. अशा सतत संपर्कात असलेल्या मराठी भाषकांचा एक भाषिक समाज कल्पिता येतो.

**संदर्भ :**


( १ ) काळे, कल्याण आणि शहा, मृणालिनी (संपा०) 'निवडक भाषा आणि जीवन', मेहता पब्लिकेशन, पुणे, १९९८.

( २ ) धोंगडे, रमेश, 'सामाजिक भाषाविज्ञान', दिलीपराज प्रकाशन, पुणे, २००६.

( ३ ) पाटणकर, जयश्री, 'सामाजिक भाषाविज्ञान : कक्षा आणि अभ्यास', ससंदर्भ प्रकाशन, नाशिक, २००५.

( ४ ) वरखेडे, रमेश, 'समाजभाषाविज्ञान : प्रमुख संकल्पना', शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, २००१.


■






अनुक्रमणिका

अनुवाद

# प्राचीनतम भाषा आणि आदिम भाषा

चिन्मय धारूरकर

[ **मूळ संदर्भ :** Saussure, Ferdinand de. 2011.(Ed. By Meisel, Perry and Saussy Haun) *Course in General Linguistics* (Tr. By Wade Baskin). New York : Columbia University Press. P 215-18]

## मराठी भाषांतराची प्रस्तावना

'भाषा आणि जीवन'च्या उन्हाळा २०११च्या अंकात सोस्यूरच्या कोर्समधील निवडक वेच्यांचे भाषांतर आले होते, [ पाहा, मालशे आणि धारूरकर (२०११) या वेच्यांच्या आधी एक प्रास्ताविक दिले होते त्यातील मजकुराची पुनरावृत्ती मुद्दामच येथे टाळत आहे ]. संपूर्ण कोर्सचेच भाषांतर होणे आवश्यक आहेच. पण सध्या प्रस्तुत प्रकरणाचे भाषांतर का केले याबद्दल इथे ऊहापोह करतो.

आजच्या भाषाविज्ञानाच्या विद्यार्थ्यांमध्ये आणि अभ्यासकांमध्ये संस्कृतचा तिरस्कार नाही तरी त्याबाबत एक साहजिक अनुत्सुकता व्यक्त करण्याचा विशेष हमखास दिसून येतो. इतका की, वाटावं की भाषावैज्ञानिक म्हणवून घ्यायचं असेल तर संस्कृतचा विषय निघताच त्याबाबत काहीतरी अनुकूल नसलेले बोलणे अनिवार्यच आहे. आणि असं केल्याने आपण आधुनिक भाषाविज्ञानाचे खरे पाईक आहोत हे प्रस्थापित होत असते. उलटपक्षी संस्कृतच्या (म्हणजे निव्वळ संस्कृतच्या) काही अभ्यासकांमध्ये संस्कृतबाबत अफाट धारणा बाळगल्या जातात. या धारणांचा माग हा भारतीय इतिहासात, भारताच्या राष्ट्रीय कथनात आणि एकूणातच लोकमानसात घेणे नक्कीच उद्बोधक ठरेल. त्यापैकी एक धारणा म्हणजे संस्कृत ही सर्व भाषांची जननी आहे, ही.

कोर्समधील प्रस्तुत वेचा हा त्याबाबतीत नक्कीच डोळे उघडणारा आहे. भाषेला आईचे, जननीचे रूपक लागू करणे हे इतिहासदृष्टी, कल्पकता आणि तर्क यांच्या अभावाचे द्योतक आहे. एक भाषा इतर भाषांची आई, जननी असणं म्हणजे नेमकं काय हा प्रश्न त्याबाबतीत उपस्थित करून मोकळ्या मनाने त्याची विचारणा केली पाहिजे. तशी केली असता आपल्या असं लक्षात येईल की जननीभाषा ही कल्पना अत्यंत भोळसट आहे. मानवी नातेसंबंधांचा तर्क (विशेषत: जननीभाषा), त्याची उतरंड भाषेला, भाषिक इतिहासाला, भाषांच्या उपपत्तीला लागूच होत नाही मुळी! माणसाला जसे आईवडील असतात, जन्मदिन आणि मृत्युदिन असतो. तसं भाषेच्या बाबतीत खरोखरीच मानता

येईल का? एखाद्या ज्ञात भाषेला जननी म्हटल्यास त्याच भाषेच्या आधीच्या अवस्थेला काय म्हणणार? आणि त्याच्या आधीच्या अवस्थेला काय? अशा प्रकारची भाषेची भूतकाळातील अखंडता ही तिला जननी हे रूपक देण्यास अडचणीची ठरते. भूतकाळातील भाषेचा एकच एक असा आरंभबिंदू पकडणं ही निव्वळ अशक्यच गोष्ट. ही अशक्यता आपल्या क्षमतेची नसून भाषेच्या स्वरूपातूनच उद्‌भवते. त्या बिंदूच्या आधी भाषा नव्हतीच, अचानक त्या बिंदूला उद्‌भवली अशी आपली मांडणी आहे असा अर्थ जननीभाषा ही कल्पना स्वीकारली तर निघते. अर्थातच असे प्रतिपादन करणे भाषेचे सातत्य नाकारणारे ठरेल, म्हणून जननी ही कल्पना, हे रूपक भाषेच्या बाबतीत गैरलागू आहे. म्हणून संस्कृतच काय, पण कोणतीच भाषा जननी ठरू शकत नाही.

असं जर आहे तर भाषाविज्ञानात भाषांचा ऐतिहासिक अभ्यास कसा केला जातो? त्या अभ्यासाची ध्येये नेमकी काय असतात? भाषाकुल आणि मूळ भाषा या कल्पनांची भाषाविज्ञानाच्या सैद्धांतिक चौकटीत मांडणी कशी केली जाते असे साहजिक प्रश्न उद्‌भवतात. यासंबंधी भाषाविज्ञानातील आदिमभाषा ही संकल्पना समजून घेतल्यास या सर्व प्रश्नांचे निरसन होईल.

आदिमभाषा ही भूतकाळातील एका खरोखरच्या काळात वावरणारी भाषा अशी कल्पना नसून ती एका तार्किक प्रारूपाची कल्पना आहे. ते एक ऐतिहासिक सत्य नसून, ती अमुक अमुक पुरावा हाताशी असताना भूतकाळात भाषेचा किंवा भाषांचा आधीचा टप्पा कसा राहिला असेल, याबाबतचा तो कयास आहे. अर्थात असा अंदाज लावायचा कसा, यासाठी कोणते नियम वापरायचे हेच गाभ्याचे सैद्धान्तिक आणि पद्धती बाबतचे प्रश्न आहेत. ध्वनी, शब्द, वाक्यरचना, इ. बाबतीत भाषेचा किंवा भाषांचा माग घेऊन आधीची, आदिम स्थिती कशी राहिली असेल असा अंदाज बांधण्याला 'पुनर्रचना' म्हणतात. अशी पुनर्रचना आपण रोजच्या जीवनातही करीत असतोच. कायद्यातही फौजदारी गुन्ह्याच्या तपासात पुराव्याच्या आधारे आणि तर्काला धरून घटनाक्रम कसा घडला असेल याबाबत अनेक शक्यता वर्तवल्या जातात. त्या सर्व तथ्यात्म असल्या तरी त्यामधील एकच क्रम हा तथ्य असतो.

भाषेच्या बाबतीत तथ्याची अशी काटेकोर कल्पना तितकी महत्त्वाची किंवा गाभ्याची नसते. आदिमभाषेच्या प्रारूपाची कल्पना ही तथ्यवाचक आहे की नाही त्यापेक्षा ती पुढील उपलब्ध पुरावा म्हणून उपलब्ध अशा भाषांची संगती लावण्यात यशस्वी होते की नाही यावर तिचे यश अवलंबून असते. याचा आणखी एक फायदा म्हणजे पुढील अवस्थेतील एखाद्या टप्प्याचे पुरावे उपलब्ध नसल्यास आदिमभाषेचे प्रारूप आणि पुढील उपलब्ध पुराव्याच्या आधारे (पुरावा उपलब्ध नसलेल्या अवस्थांची किंवा टप्प्यांची) मांडणी करता येते. आणि ती तर्कावर आधारित असल्याने तथ्यात्म किंवा तथ्यरूप असण्याची

दाट शक्यता असते. खुद्द सोस्यूरच्या बाबतीतच हे खरे ठरले आहे. हिटाईट भाषेबद्दल अत्यंत तोकडा पुरावा सोयूरच्या हाताशी होता. हिटाईट ही इंडो-युरोपीय कुळातील ॲनाटोलियन उपकुळातील भाषा. जुन्यात जुना पुरावा हा आजच्या तुर्कस्तानात इ०स०पूर्व १६ ते १३पर्यंतचा मिळतो. त्याची उकल सोस्यूर हयात असेपर्यंत झाली नव्हती. सोस्यूरने या भाषेत ग्रसनीच्या आकुंचनातून उत्पन्न होणारे अर्थात ग्रसनीज अ आणि ह पैकी ह असावा असा अंदाज बांधला होता. पुढे पुरावा उपलब्ध झाल्यावर सोस्यूरचा अंदाज खरा ठरला. या अंदाजबांधणीला महत्त्व होते; कारण त्यात स्वरयंत्रीय सिद्धान्तच दडलेला होता. स्वरयंत्राच्या आकुंचनातून उत्पन्न होणारे ग्रसनी, कंठच्छद आणि कंठविवर यांतून निघणारे ध्वनी हे भाषाकुलातील स्वरव्यवस्था (वोकॅलिझम) आणि इतर ध्वनींची संगती लावण्यास उपकारक ठरले. या ध्वनींच्या प्रारूपगत मांडणीतून अनेक स्वरांची संगती लावता आली आणि त्यामुळे ध्वनिबदलाचे स्पष्टीकरणही हाती आले. यामुळेच याला 'सिद्धान्त' म्हणायचे.

**मूळ लेखाचे भाषांतर :**

अगदी सुरुवातीच्या काळातील इंडो-युरोपीय भाषाविज्ञानाच्या अभ्यासकांना पुनर्रचनात्मक पद्धतीचे ना खरे प्रयोजन कळले होते ना तिचे महत्त्व. त्यांनी केलेल्या एका घोडचुकीचे स्पष्टीकरण हे त्यातूनच मिळते. ती चूक म्हणजे, त्यांनी संस्कृतला इतकी अतिशयोक्त आणि जवळजवळ अपवादात्मक अशी भूमिका बहाल करणे, ही होय. आदिम-इंडो-युरोपीय भाषेचा सगळ्यात जुना ऐवज हा संस्कृत असल्याने त्यांनी संस्कृतला आदिमभाषेच्या हुद्द्यावर नेऊन बसवले. संस्कृत, ग्रीक, स्लाविक्, केल्टिक, इटालिक इ० भाषा आदिम इंडो-युरोपीय भाषेतून निपजल्या असे मानणे, ही एक वेगळी गोष्ट झाली आणि आदिम इंडो-युरोपीय भाषेच्या जागी यांपैकी एका भाषेला योजणे ही पूर्णपणे वेगळी गोष्ट झाली. अगदी सुरुवातीच्या अभ्यासकांनी केलेल्या या चुकीचे, बहुविध आणि दूरगामी स्वरूपाचे पडसाद उमटले. मी जितक्या परखडपणे मांडतोय तितक्या स्पष्टपणे अर्थातच त्यांनी या गोष्टीचा उच्चार केलेला नाही; पण त्यांच्या व्यवहरात हे अप्रत्यक्षपणे स्वीकारलेलेच होते. ''संस्कृत हा समान स्रोत असू शकत नाही असे आपल्याला वाटते'' असे बॉप म्हणतो. भलेही तो शंका व्यक्त करण्याच्या सुरात का म्हणत असे ना; पण त्यातून असा अर्थ निघतो की जणू काही अशा गृहीतकाची मांडणी करता येण्याची शक्यता होतीच.

**सैद्धांतिक पातळीवर विचार**

अमुक एक भाषा दुसरीपेक्षा वेगळी असते म्हणजे काय, असा प्रश्न उपस्थित करणे यामुळे आपल्याला भाग पडते. सैद्धांतिक पातळीवर तीन प्रकारे अर्थ लावता येईल :

( १ ) जुनी म्हटल्यावर त्यातून भाषेची सुरुवात, तिचा आरंभबिंदू असा निर्देश होऊ शकतो. थोडा विचार केला तरी हे स्पष्ट होईल की भाषेचे वय असे आपण काढू शकत नाही. कारण, भाषा म्हणजे आधी काय बोलले जात होते याचे सातत्य असते. जे माणसांबाबत खरे आहे (माणसांचे वय काढता येते, त्यांना आयुर्मान असते, जन्मदिन आणि मृत्युदिन असतो इ०), ते भाषेला लागू होत नाही. निखळ सातत्यामुळे तिच्यातील खंड आपल्याला पाडता येत नाहीत. गास्तो पारी याने भगिनी भाषा आणि जननी भाषा या संकल्पनांवर केलेली टीका ही समर्थनीय ठरते; कारण, या कल्पनांमध्ये खंड गृहीत धरले जातात. या अर्थी 'जुनी' हे (विशेषण) निरर्थक आहे.

( २ ) जुनी (पेक्षा जुनी. प्राचीनतर) यातून आपण अभ्यासत असलेली भाषा ही त्याच भाषेच्या अन्य एका अवस्थेपेक्षा आधीची आहे असाही अर्थ घेता येऊ शकतो. म्हणून फिरदौसी फार्शीपेक्षा आर्कमेनीय शिलालेखातील फार्शी जुनी ठरते. अशा विशिष्ट बाबतीत जेथे एक भाषा दुसरीनंतर विकसित झालेली आहे हे स्पष्ट आहे आणि त्या दोन्ही सुविदित आहेत. आपण अर्थातच आधीची भाषा पूर्ववर्ती आहे असेच म्हटले पाहिजे. पण जोवर दोन्ही अटींची पूर्तता होत नाही तोवर कालगत पूर्ववर्तित्व याला काही महत्त्व नाहीत. म्हणून इ०स० १५४०पर्यंत सप्रमाण मागे जाणारी लिथुआनियन किंवा दहाव्या शतकापर्यंत जिचा पुरावा मागे जातो ती जुनी स्लाविक काही महत्त्वाच्या ठरत नाहीत.

( ३ ) अखेरीस 'जुनी' याचा अर्थ आधीच्या प्राचीन भाषेची स्थिती. म्हणजेच, मूळ प्रारूपातील रूपांच्या अधिक जवळ जाणारी रूपे ज्या भाषेत सापडतात अशी भाषा. मग याबाबतीत (ऐतिहासिक पुराव्यांच्या) तारखांचा प्रश्न राहतो बाजूला. आणि या न्यायाने सोळाव्या शतकातील लिथुआनियन इ०स०पूर्व ३कालीन लॅटीनपेक्षा अधिक जुनी ठरते.

### संस्कृतचे स्थान

केवळ दुसऱ्या आणि तिसऱ्या अर्थाने संस्कृत ही इतर भाषांपेक्षा जुनी आहे. ती दोन्ही व्याख्यांमध्ये बसणारी आहे. वैदिक सूक्ते ही जुन्यात जुन्या अनेक संहितांपेक्षा जुनीच ठरतात. तसेच अधिक महत्त्वाची बाब म्हणजे प्राचीन वैशिष्ट्ये जपणाऱ्या भाषांच्या तुलनेत संस्कृतातही प्राचीन वैशिष्ट्ये लक्षणीय संख्येने सापडतात.[१]

परंतु आपल्या आयुर्मानाच्या संभ्रान्त संकल्पनेमुळे सगळ्यात आधीच्या भाषाशास्त्रज्ञांनी संस्कृतला भाषाकुटुंबाच्या आधी नेऊन ठेवले.[२] नंतर भाषाशास्त्रज्ञांनी भलेही 'संस्कृत ही जननीभाषा' या समजापासून सुटका करून घेतलेली असली तरी उपलब्ध

असणाऱ्या पुराव्यानुसार आधीची भाषा म्हणून ते तिला अधिक महत्त्व देत राहिले.

आपल्या 'Les Origins Indo-Europeenes' या ग्रंथात पिशे एका भाषेसह असणाऱ्या पूर्वकालीन राष्ट्राची कल्पना करतो. त्या भाषेबद्दल विचार करताना आपण संस्कृतला सतत प्रथम विचारात घेतले पाहिजे. कारण संस्कृतातून उपलब्ध होणारा पुरावा हा इतर अनेक इंडो-युरोपीय भाषा एकत्र केल्यावर हाती लागेल त्यापेक्षा कितीतरी जास्त मोलाचा आहे, असे तो म्हणतो. या भ्रमापोटी अनेक महत्त्वाच्या गोष्टी गूढ राहिल्या, उदा० इंडो-युरोपीय भाषांतील वोकॅलिझम.[३]

ही चूक छोट्या पातळीवर आणि तपशिलातही अनेकदा करून झालेली आहे. इंडो-युरोपीय भाषाकुटुंबातील विशिष्ट शाखांच्या अभ्यासकांना सगळ्यात आधीची भाषा ही परिपूर्ण आणि अधिक समाधानकारक प्रतिनिधी वाटली आणि त्यांनी मूळ अवस्थेचा अधिक सखोल अभ्यास करण्याचा प्रयत्न केला नाही. उदा० जरमॅनिकबद्दल बोलताना गॉथिकचा दाखला देऊन तेथेच थांबण्यात त्यांना काहीच अडचण नव्हती. कारण गॉथिक जरमॅनिकपेक्षा कितीतरी शतकांनी अधिक प्राचीन आहे. (पूर्ववर्ती भाषेने) अशा प्रकारे आदिम भाषेची भूमिका बजावायला सुरुवात केली आणि इतर भाषांची ती स्रोत बनली. स्लाविक बाबतीत त्यांनी त्यांचे संशोधन पूर्णपणे स्लॅवॉनिक किंवा जुन्या स्लाविकवर बेतवले. तिचा पुरावा दहाव्या शतकापर्यंत मागे जाणारा होता, आणि इतर स्लाविक भाषा या त्यानंतरच्या काळातील ठरतात.

कालक्रमात एकानंतर एक असे लिहिले गेलेले भाषेचे दोन नमुने एकाच बोलीचे (idiom) प्रतिनिधित्व करीत असतात असे क्वचितच आढळून येते. बऱ्याचदा आपल्याला असे दिसून येते की, एक बोली ही दुसरीच्या मागून येणारी नसते. (अर्थात) अपवादाने नियम सिद्धच होतो. सगळ्यात प्रसिद्ध अपवाद म्हणजे लॅटिनच्या अनुषंगाने रोमान्स भाषा[४], हा. फ्रेंचचा माग लॅटिनपर्यंत लावताना आपण सरळ उभा मार्ग पत्करतो. रोमान्स भाषांचा प्रदेश हा लॅटिनच्या प्रदेशाशी जुळतो आणि म्हणून इतर प्रत्येक बोली (idiom) ही लॅटिननंतरचीच असा सरधोपट अर्थ घेतला जातो. फार्शी ही अजून एक अपवाद. दरिउस शिलालेखातील[५] फार्शी आणि मध्ययुगीन फार्शी ही एकच भाषा आहे. पण सर्रासपणे उलटेच घडत असते. वेगवेगळ्या काळात सापडणारे लिखित दस्तऐवज हे सामान्यपणे एकाच भाषाकुटुंबातील वेगवेगळ्या बोलींचे (dialects) असतात. उदाहरणार्थ, जरमनिक ही आधी उल्फिलासच्या[६] गॉथिकमध्ये सापडते, मग जुन्या उच्च जर्मनमध्ये आणि मग अँग्लो सॅक्झन आणि जुन्या नोर्स संहितांमध्ये इ० यातील एकही भाषा ही किंवा भाषासमूह हा आधीच्या पुराव्याशी (भाषेच्या एकत्वाच्या अंगाने) सातत्य दाखवणारा नाही.

**भाषाशास्त्राचा अमूल्य ठेवा**

खालील आकृतीत अक्षरे ही भाषांचा निर्देश करतात; तर बिंदुमय रेषा या कालक्रमाचा. तेव्हा सामान्यपणे आढळून येणारी परिस्थिती ही अशी असते :

..................क.... कालखंड १

.............ख.......... कालखंड २

.....ग............घ.... कालखंड ३

...................ङ.. कालखंड ४

हा साचा म्हणजे भाषाशास्त्राचा अमूल्य ठेवा आहे. जर आनन्तर्य (नंतर येणे) एका सरळ रेषेत असते; तर आपण नंतरच्या अवस्थांचे विश्लेषण करून ताडलेले सारेच काही, प्रथम ज्ञात भाषावस्था 'क'मध्ये (सरळसरळ) आले असते. पण या साच्यातील सर्व भाषावस्थांचा (क, ख, ग, घ इ०) सामान्य असा संगमबिंदू शोधून आपण 'क'पेक्षा जुनी अशी भाषावस्था कल्पू शकतो (त्याला आदिमप्रकार 'आ' म्हणू) आणि अशा प्रकारे 'क'ला 'आ' म्हणणे टाळू शकतो.

**भाषांतरकाराच्या टिपा :**

( १ ) पहिल्या प्रकरणात सोस्यूर भाषाविज्ञानाच्या इतिहासावर एक दृष्टिक्षेप टाकतो आहे. त्या तो बॉप, विल्यम जोन्झ, ग्रिम, मॅक्स म्युलर यांच्या योगदानाची नोंद घेतो. भाषाभ्यासाचे तीन टप्प्यांची कल्पना तो मांडत आहे. पहिला हा सामान्य आदेशात्मक व्याकरणाचा टप्पा होय. यात केवळ शुद्ध, अशुद्ध शब्दांचा पारंपरिक विवेकाचा अंतर्भाव होतो आणि ठोस वास्तविक प्रयोगाच्या निरीक्षणांचा त्यात अभाव असल्याने हा भाषाभ्यास हा मर्यादित स्वरूपाचा होता. दुसरा टप्पा हा वाङ्मयविद्येच्या अभ्यासाचा. यात एखाद्या भाषेच्या भूतकाळातील साहित्याचा अभ्यास अंतर्भूत होता. त्याच भाषेचे विविध टप्पे, तिचा विकास, तिच्यातील संहिता, त्यांचे लेखक, शैली इ० विषयांचा अभ्यास होत असे. सांप्रत बोलीच्या अभ्यासाला मात्र त्यात काही स्थान नव्हते. तिसरा टप्पा हा तौलनिक वाङ्मयविद्येचा. यात भाषाभ्यासकांना प्रथमच कळले की भाषांची एकमेकींशी अर्थपूर्ण पद्धतीने तुलना करता येऊ शकते. १८१६ साली फ्रान्ट्स बॉपचा 'युवर डास कोन्युगेत्सिओन-सिस्टेम डेर संस्क्रित-श्प्राखे' हा ग्रंथ प्रकाशित झाला. त्यात त्याने संस्कृतची तुलना जर्मन, ग्रीक, लॅटीन या भाषांशी केली आहे. या तपशिलाचा संदर्भ प्रस्तुत प्रकरणात आला आहे.

( २ ) पहिल्या टिपेमधील तपशिलासोबतच मूळ संदर्भाच्या त्याच पानावर पुढे संस्कृतात कशा प्रकारे जुनी वैशिष्ट्ये सापडतात आणि कशा प्रकारे ती ग्रीक, लॅटिनमध्ये सापडत नाहीत, पण त्याच बरोबर इतर काही वैशिष्ट्ये कशी सापडत नाहीत याचा थोडा खुलासा आहे. एक तक्रारवजा निरीक्षण सोस्यूर नोंदवतो ते असे की, तौलनिक भाषाशास्त्रात केवळ तुलनाच होत राहिली, त्यात ऐतिहासिकतेचा मात्र अभाव होता.

( ३ ) (अ) वोकॅलिझम म्हणजे स्वरात होणारा बदल. एका भाषेतील स्वर दुसऱ्या भाषेत नियमबद्धपणे बदलतात. याला या अर्थी स्वरान्तर म्हणता येईल. आदिमभाषेच्या प्रारूपातून कुलातील भाषांच्या स्वरांमधील नियमबद्ध परस्परसंबंध व्यक्त करण्याची क्षमता असते. स्वरव्यवस्था हा शब्द वोकॅलिझमसाठी वापरात आहे. आदिमभाषेत स्वरयंत्रीय सिद्धान्तानुसार ग्रसनी आदि स्थानांतून उत्पन्न होणारे व्यंजनध्वनीदेखील आदिम असू शकतात. त्यांच्या साहाय्यानेही पुढील टप्प्यातील स्वरांची उपपत्ती मांडता येते. तेव्हा केवळ एका स्वराचा दुसरा स्वर होणे अशी मांडणी नसून आधीच्या अवस्थेत व्यंजन होते पुढे त्यातून स्वरांची व्यवस्था स्पष्ट केली जाते. त्या अर्थी स्वरव्यवस्था हा शब्द समर्पक आहे. संस्कृतला मूळ पदावर ठेवल्याने आदिम-इंडो-युरोपीय भाषा आणि त्या कुलातील इतर भाषांमधील स्वरान्तराचे पूर्ण चित्र मिळणे अवघड होते. (आ) आणखीन एक उदाहरण म्हणजे मूर्धन्य स्वनिमांचे. संस्कृतला आदिपदावर ठेवले तर अर्थातच मूर्धन्याचा इतर भाषांतील अभाव आणि संस्कृतातील प्रादुर्भाव याची संगती लावणे कठीण होऊन बसेल. मूर्धन्य ध्वनी हे जगात केवळ इंडिक उपकुटुंब आणि द्रविड भाषाकुलात सापडतात. संस्कृत (आणि इंडिकभाषा) सोडून इतर इंडो-युरोपीय भाषांमध्येही मूर्धन्य ध्वनी सापडत नाहीत.

( ४ ) इंडो-युरोपीय भाषाकुलातील इटालिक या उपकुलातील एक उपकुल. वल्गर लॅटीन ही या कुलातील भाषांची आदिम भाषा मानली जाते. रोमान्स उपकुलांतर्गत वेस्टर्न रोमान्स, इस्टर्न रोमान्स आणि सार्डिनियन अशी विभागणी केली जाते. या कुलातील फ्रेंच, स्पॅनिश, इटालिय, पोर्तुगीज इ० भाषा आपल्या परिचयाच्या आहेत.

( ५ ) दरिउस (५२२ ते ४८६ इ०स०पूर्व) हा पर्शियन साम्राज्याचा राजा होता. त्याच्या नावे शिलालेख आहे. तो केर्मानशाह राज्यात बेहिस्तुन पर्वतावर सापडतो. दरिउसचेच कथन या शिलालेखात आहे. अहुर मज्दाच्या कृपेने आपण सर्व लढायांमध्ये यशस्वी झाल्याचे दरिउस त्यात सांगतो.

( ६ ) उल्फिलास (३१०-३८३ इ०स०) हा एक बिशप, मिशनरी आणि बायबलचा भाषांतरकार होता. त्याने बायबलचे भाषांतर गॉथिकमध्ये केले होते. जरमनिक भाषेचा पुरावा म्हणून उल्फिलासच्या गॉथिककडे पाहिले जाते. गॉथिक हीच मुळी एक नामशेष झालेली जरमनिक भाषा होती. ती आठव्या, नवव्या शतकापर्यंत नामशेष झाली होती.

**संदर्भ :**


( १ ) धारूरकर, चिन्मय. 'भाषेचे मायपण', अक्षर दिवाळी अंक, अक्षर प्रकाशन, मुंबई, २०१३.

( २ ) मालशे मिलिंद आणि चिन्मय धारूरकर. 'सोस्यूरचा भाषा वैज्ञानिक विचार - (कोर्स इन जनरल लिंग्विस्टिक्स)' या ग्रंथातील निवडक वेच्यांचे भाषांतर, भाषा आणि जीवन. उन्हाळा : २०११, अंक २, पुणे. मराठी अभ्यास परिषद. ■


### कट्ट कडकट्ट कट्ट...

तार हे प्रकरण सगळ्यांच्या मनात भीती बसून राहिलेले होते. तार खात्यानेच मग ही भीती दूर करण्यासाठी तारेचे विविध प्रकारचे मजकूर तयार केले. म्हणजे लग्नाच्या शुभेच्छा, प्रवासासाठी शुभेच्छा, पुत्रप्राप्तीचा आनंद, पारितोषिकासाठी अभिनंदन वगैरे. अशा मजकुरांना क्रमांक असायचे. पोस्टात जाऊन नुसता क्रमांक सांगितला, की ती तार घरपोच मिळायची. तार वेळेत पोहोचवणे हे पोस्टासाठी दिव्य असायचे. पत्ता शोधून वेळेत पोहोचणे हे पोस्टमनसाठी २४ तासांचे काम असे. नोकरदारांना अनेकदा तार हे रजा मिळाल्याचे हुकमी शस्त्र वाटत असे. दूरच्या गावातून आलेली 'स्टार्ट इमिजिएटली'ची तार रजेच्या अर्जाला जोडली की काम फत्ते! तार हे त्या काळातल्या वृत्तपत्रांचे एक अतिशय विश्वासू आणि जलद दळणवळणाचे साधन असे. बातमी वेळेत पोहोचण्यासाठी पत्रकारांना तारेशिवाय पर्याय नसे. त्यासाठी मराठी शब्द रोमन लिपीत लिहिण्याचे कसब अंगी बाणवावे लागे. प्रत्येक पन्नास शब्दांनंतर कंसात पन्नास असा आकडा लिहिण्याचे बंधन असे. तारेचे दर शब्दागणिक असल्याने प्रत्येक शब्दाला महत्त्व फार. निवडणुका, साहित्य संमेलन अशांसारख्या घटनांचे वार्तांकन करणाऱ्या पत्रकारांना तारेचे अधिकृत ओळखपत्र दिले जायचे. पैसे न देता तार करण्याचा हा परवाना म्हणजे पत्रकारांसाठी कितीतरी प्रतिष्ठेची गोष्ट असायची.

संपादकीय, 'लोकसत्ता' शनिवार १५ जून २०१३






अनुक्रमणिका

# अहिराणी बोलीचे शब्दविशेष

सुधीर रा० देवरे

**अहिराणीचा भूगोल व इतिहास (संक्षिप्त) :**

धुळे, नंदुरबार, नाशिक व जळगाव या चार जिल्ह्यात अहिराणी बोली बोलली जाते. सुमारे २५० ते ३०० किमी लांब व २०० किमी रुंदीच्या भौगोलिक पट्ट्यात ही भाषा आढळते. सातपुडा पर्वत, वाघुर नदी, अजिंठ्याचे डोंगर, चांदवड सह्याद्रीच्या रांगा अशा तिच्या चार सीमा स्थूलपणे सांगता येतील. तापी, नर्मदा, वाघुर, गिरणा, पांझरा, मोसम, आरम या नद्यांच्या खोऱ्यात अहिराणी बोलली जाते.

(१) अभिरांची भाषा अभिराणी, अभिराचा अपभ्रंश अहिर.अहिरांची भाषा ती अहिराणी. अभिर-अहिर लोकांचे वास्तव्य खासकरून खानदेशात होते.

(२) खानदेश या प्रदेशावरून अहिराणीला खानदेशी म्हणतात.

(३) बागूल नावाच्या राजावरून बागलाण प्रांत झाला. बागलाणची राजधानी मुल्हेर. बागलाण प्रांताच्या नावावरून अहिराणीला 'बागलाणी' असेही म्हणतात. म्हणून अहिराणी, खानदेशी व बागलाणी ह्या वेगळ्या भाषा नसून व्यापक अर्थाने एकाच भाषेची तीन नावे आहेत.

(४) अहिराणीचा लिखित पुरावा चाळीसगावजवळच्या पाटण येथील इ०स० १२०६च्या शिलालेखात सापडला. हा शिलालेख ज्ञानेश्वरीपूर्वीचा आहे.

(५) अहिराणी बोली उपयोजित झालेला पहिला वाङ्मयीन लिखित पुरावा लीळाचरित्रात मिळतो. ढासलं, रांधलं, पुंजं असे काही अहिराणी शब्द लीळाचरित्रात दिसतात.

(६) ज्ञानेश्वरांना येणाऱ्या भाषांत संस्कृत, मराठी व बागलाणी ह्या प्रमुख भाषा होत्या, असे वि०का० राजवाडे यांनी 'राधामाधवविलासचंपू'च्या प्रस्तावनेत नमूद केले आहे. (पृ० १४)

(७) ज्ञानेश्वरांनी बागलाणी गवळण, बागलाण नवरीचे अभंग व काही पदे लिहिली आहेत :

(अ) गवळण : तन्हा मराठी देश मन्ही बागलाणी भाष!
मन्हा रे कान्हा, मन्हा रे कान्हा!

(ब) नवरीचे अभंग : करी वो अद्वैत मला केल्यो इसन्यो
सहिंवर सिद्ध पुरासि गयो ।

(क) पदे : यशोदेना बाय तान्हा मले म्हने हादू ले वो
मी तं बाई साधी भोई गऊ त्याना जवई

(८) सर ग्रियर्सन यांनी 'लिंग्वेस्टिक सर्वे ऑफ इंडिया', खंड 9च्या भाग तीनमध्ये अहिराणीचा उल्लेख केलेला आहे, तो भिल्ली बोलींच्या वर्गीकरणात. तो अर्थातच चुकीचा आहे. अहिराणी ही लोकभाषा आहे. कोणत्याही विशिष्ट जातीची-जमातीची नव्हे.

**प्रास्ताविक :**

एक भाषा दुसऱ्या भाषेपेक्षा वेगळी असणारच. अथवा एखादी भाषा दुसऱ्या भाषकाला अगम्य वाटते, ती त्या विशिष्ट भाषेतल्या वेगळ्या शब्दसामर्थ्यामुळे. म्हणून कोणत्याही भाषेचा अभ्यास करताना त्या भाषेचे शब्दसामर्थ्य समजून घेणे महत्त्वाचे ठरते. ज्या कारणांमुळे, आदिमता आणि वेगळ्या शाब्दिक सामर्थ्यावर एखाद्या विशिष्ट स्वतंत्र भाषेचे अस्तित्व टिकून असते, अशा भाषेतील शब्दांची यादी, संकलन वा जमल्यास व्युत्पत्तीकडे जाण्याचा मार्ग उपयुक्त ठरतो. या सूत्रानुसार अहिराणी बोलीतील शब्दांच्या उगमाकडे अहिराणी बोलीच्या प्रत्यक्ष उपयोजनातून म्हणजे काळ, समाज आणि परिवेशातून जाण्याचा प्रयत्न करून पाहिला. शब्द, त्याचा अर्थ, उपयोजनाचे उदाहरण, तसेच काही म्हणी व ओवी यांतून शब्दांचा अर्थ तपशील उलगडण्याकडे या निबंधात विशेष लक्ष दिले आहे.

**नाते :**

आंडोर/आंडेर : आंडोर म्हणजे मुलगा. पुल्लिंगी लिंगदर्शक. मूळ शब्द आंड. आंड असलेला पोर तो आंडोर. जे आंडोर नाही, म्हणजे जी मुलगी आहे, ती आंडेर.

डिक्रा/डिक्री : डिकरा म्हणजे पुतण्या, तर डिकरी म्हणजे पुतणी. आंडोर/आंडेर सारखीच ही जोडी आहे. *माले दोन आंडरो, एक डिकरा आणि दोन डिकऱ्या शेतीस.*

फुई : आत्या. कुटुंबातले सगळे अवगुण फुईवर लादले जातात. घरात एखादी मुलगी वेगळी वागायला लागली की, ती आत्यावर गेली असे म्हणीतून म्हटले जाते : *आईवर ना बाईवर जाई पडी फुईवर.*

फुवा/फुआ : आत्याचे पती

हू/ऊ : *सून. हायी मन्ही दाखली सून शे*

मेव्हनभाऊ/ मेव्हनबहिन : मामेभाऊ/ मामेबहिण. *तो मन्हा मेव्हनभाऊ लागस, ती मन्ही मेव्हनबहिन शे*

धैडा/धैडी : बाप/आई अथवा बाप-आईच्या वयाचे, म्हातारी-री. *घर धैडा-धैडी रहातस ना*

आजला/आजली : आजोबा/आजी. *तिले आजलाच शे, आजली नही.*

दाजी : मेव्हणे, भाऊजी. *त्या ना, दाजी शेत ना आमना*

ननीन : नणंद, नवऱ्याची बहीण.

नंदयी : नणंदेचे पती

मुराई (मुऱ्हाळी) : पाहुणा, सणासुदीला मूळ येणारे पाहुणे.

वंजी : वन्स, वहिनी

गोत : नातेवाईक

**शरीर-व्यापार :**

आडापड : झोप. आड्डा. आडवा पड. *आता आडा पड उकाव, खाई पिदं आनि गया आडा पडी.*

आदमला : थकून जाणे, दमून जाणे. एखादी गोष्ट करून, काम करून अथवा शरीराची व्याधी सांभाळून थकणे.

*तो धैडा खोकली खोकली आदमला व्हयी जास.*

उजाग्रा : जागरण. उजागर करणे असेही म्हणतात. उठणे. लोक उठेपर्यंत जागे रहाणे म्हणजे उजाग्रा.

*कालदिस भवाडा पाऱ्हाले गऊ म्हनीसन रातभर उजाग्रा जया.*

काल्यावाल्या : मळमळ. एखाद्या गोष्टीची एकदम काळजी वाटू लागणे. धडधड.

*जीव नुसता मन्हा काल्यावाल्या करी वना.*

इयाम : मूर्च्छा, शुद्ध हरपणे. *हायी आयकीसन त्याले इयामच वनी.*

डर : ढेकर. *डर येवापावत खायच तू.*

हेळना : कष्ट, वेदना, हाल. *बाळंतीनन्या भयान हेळना जयात.*

भेमकायी : घाबराई, घाबरनं, भीती. *तशे नको करू भाऊ तो भेमकाई जाई.*

पुरखी : वयस्कर, वय झालेली, अनुभवी व्यक्ती. तो-पुरखा, ती-पुरखी. एखादी अल्पवयीन मुलगी शहाणपणा शिकवावयला लागली की तिला म्हटले जातं. *काय पुरखी धैडी इयास व माय तू.*

फिंद्रा/फिंद्री : फिंद्रा म्हणजे अनेक मुलं. हा शब्द अनेकवचनी आहे. मात्र फिंद्री म्हणजे नको असलेली मुलगी. अहिराणीत मुलीला आंडेर म्हणत असले तरी नको असलेल्या मुलीला फिंद्री म्हणतात. आंडेर ही स्वतःची मुलगी. कोणाच्या परक्या मुलीला फिंद्री म्हटले जाते. शिवी.

*फिंद्रा काय डाच करी रहायनात, आमना घर आखो येक फिंद्री जलमले वनी.*

बुचका : वाईट अर्थाने मुलांची गर्दी. मुलांचा गोंधळ, गोंगाट, बेशिस्तपणा.

*या बुचका आठे काय डाच करी रहायनात.*

बुथडं : हाताच्या चिमटीत पकडलेल्या शरीराच्या मांसाळ भागाला बुथडं म्हणतात. कुत्र्याने माणसाच्या शरीराचा लचका तोडला तर त्यालाही बुथडं म्हणतात.

*त्यानी मन्हा गालनं बुथडं धरी घिदं व्हतं. त्या कुत्रानी मन्हा पायनं बुथडंच तोडी घिदं.*

फिस्क : अंगावरील चिघळलेल्या जखमेला फिस्क म्हणतात. *त्याना आंगवर फिस्काच फिस्का शेतंस.*

आंजूट : शरीरावर खाजवणारा व फुगीर होऊन येणाऱ्या विशिष्ट पुरळाला आंजूट म्हणतात.

बुरची घेनं : बलात्कार करणे, बळजबरी संभोग घेणे. वाक्प्रचार. *त्यानी उसस्मा त्या बाईले बुरची घिदं.*

झाडाबसाले : संडासला जाणे, शौचास जाणे. झाडा म्हणजे झाडून टाकणे, अनावश्यक गोष्ट काढणे, फेकणे यावरून हा शब्दरूढ झाला असावा. *मी झाडा बसाले जाई येस. तो झाडा बसाले गया.*

ढांजनं : लागून पडणे, वावडं असणे.

चावळनं : बोलनं. *काय चावळी चावळी नुसता गाडा भरी रहायनात.*

*'चावळनं बोलनं आमनाकडे, पाव्हनाले जेवन तुमनाकड'* ही म्हण आहे.

खिदळ : खिजवण्यासाठी हसणे. *काय कधळना खिदळी रहायनात रे.*

कुद : पळ. *व्हय ते कुदत जाय लवकर.*

खंगाळ : धोय. *येवढा भांडा खंगाळी घेस नि निंघसस.*

लवंड : लोळणे. *जरासा लवंड उकाव आता.*

भवड : फिरणे. *कथा भवही रहायना रे*

तंगाड : हाकलणे, *ह्या कुत्राले तंगाड तं*

**क्रियापदे :**

| मराठी | अहिराणी |
|---|---|
| आहे | शे |
| होते | व्हस |
| जातो/जाते | जास |
| करतो/करते | करस |
| आलो/आली | वनू |
| निघालो/ निघाले | न्हींगनू/न्हींगनात |
| केले | कयं |
| गेला/गेली | गया/गयी |

| | |
|---|---|
| होता/होती | व्हता/व्हती |
| येईल | यी |
| मिळालं | मिळनं |
| भेटला/भेटली | भेटना/भेटनी |

| **वाक्ये :** **मराठी** | **अहिराणी** |
|---|---|
| तो गेला | तो गया |
| मला मळ्यात जायचं आहे. | माले वावरात जानं शे |
| कुठं गेला होता? | कथा गयथा? |
| कोणाला मिळालं? | कोनले मिळनं? |
| कुठं चालला? | कथा चालना? |
| ही कोणासारखी दिसते? | हायी कोनामाळेक दखास? |
| उद्या मी घेऊन येईन. | सकाळ मी घी इसू. |
| असा काय करतोस? | आशा काय करी रृहायना? |
| तुझा मुलगा आहे का? | तुना आंडोर शे का? |

**खाणं, पिणं, स्वैंपाक :**

इसडं : मांसाहार. सर्व प्रकारच्या मांसाहाराला इसडं अथवा वशीट म्हटलं जातं. याबाबतचा एक विनोद - अहिराणी भाषिक - *तुम्ही इसडं खातंस का*

मराठी भाषिक - *नाही*

(ही मटण मार्केट रस्त्यावरील प्रश्नोत्तरे. आणि मटण घेण्यासाठी दोन्ही जण एकाच दुकानात पोहोचतात.)

*काहो तुम्ही म्हणेत ना तुमले इसडं चालत नही*

*इसडं म्हणजे काय?*

*मटन!*

*मग मला आधी नाही का सांगायचं तसं!*

वशीट : मांसाहार. वशीट व इसडं समान अर्थी

*तुम्ही वशीट खातस का?*

सागोती : मटण. *आत आमनाकडे सागोती आनेल शे.*

कोंडाळं : थालिपीठ. कोंडाळं आता विविध धान्यांच्या सात प्रकारच्या पिठांपासून तयार करतात. पण पूर्वी सात प्रकारच्या कोंड्यांपासून हा पदार्थ बनवत असत, म्हणून ते कोंडाळं.

*आज न्याहारीले कोंडाळा कयथात.*

समार : मसाला. भाजीत टाकण्यासाठी समार तयार करतात. लाल मसाला, काळा मसाला. त्यालाच लाल समार, काळा समार म्हणतात. *माले सकाळ मिरच्या भुजी काळा समार दळना शे*

*पावनी वनी भेटाले, लागी समार वाटाले* - एक म्हण

साक/पालं : भाजी

*आज काय पालं काय. डुबुक वडासनं पालं कयं.*

घुगरी : उस्सळ. *जेवाले हरभरानी घुगरी व्हती.*

राधनं : स्वैंपाक. *चाल माय, अजून रांधनं शे माले.*

बाशी : शिळं. *रातनं बाशी पडेल व्हतं, त्यानीच न्यारी करी घिदी.*

साक्रू : रताळी. *यंदा सगळा साक्रूसले कावळी लागी गयी.*

जाम : पेरू. *झाडले जामच जाम शेतस.*

सोला : शेंगदाणा. शेंगेदून, फळातून सोलून काढलेली बी- सोलून काढलेला गोळा म्हणजे सोला. शिश्नाच्या पुढील फुगीर भागालाही सोला म्हणतात.

तीस : तहान. *पानी आन वं, माले कधळनी तीस लागनी.*

तमान : ताट. *भाकरीससांगे तमान बी दि धाड, म्हंजे कालामोडी खाता येस.* बंगालीतही ताटाला तमान म्हणतात.

पावशी : विळी, कांदा, मिरची, कोथिंबीर, भाज्या कापण्याच्या साधनाला पावशी म्हणतात.

बोघनं : पातेले. सर्व प्रकारच्या लहानमोठ्या पातेल्यांना बोघनं म्हणतात.

*नानीले कान शेत, नानाले कान नही*

*नानीनं शहानपन, नानाले येत नही* - म्हणजे, पातेले आणि कढई

भरडकी : भरडून डाळ तयार करते ती भरडकी. भरडकी ही घरोट-जात्यापेक्षा आकाराने लहान असते. म्हणून घरोट पुल्लिंगी तर भरडकी स्त्रीलिंगी. *भरडीनागत घरोट ती येकटीच वढस माय.*

भरडकीची वरची तळी बारीक. घरोटची जाड असते.

धुनी : शेकोटी. *हिवाळात सकाळीज जो तो धुनीजवळ बसस. हिव वाजा लागं धुनी शिलगाव रे.*

वरमाड : खाय. खेळता खेळता जेवणाऱ्या मुलाला आई म्हणते, *वरमाड उकाव लवकर.*

काठोक : भाकरी थापण्यासाठी बनवलेली लाकडाची वस्तू. *ती अजून सुद्धा काठोकमाच भाकरी रांधस.*

खापर : पुरणपोळी करण्यासाठी विशिष्ट फुगीर आकाराचे मातीचे भांडे. *खापरण्या पोळ्या कयात.*

(यकोळं : मराठवाड्यातील एका बोलीभाषेतला शब्द. मातीचा तवा.)

फुरका : ओरपणे. *कढीना तो आशा फुरका मारे कनी.*

वडगन/आडसन : भाजी पसरू नये म्हणून ताटाला तिरपे ठेवणारा लाकडाचा तुकडा. वडगन लावले तर एकाच ताटात भाजी आणि भाकरी वाढून जेवता येते.

निवत : नैवेद्य.

सोळ्या : पुऱ्या

पोतारा : चूल पुसण्यासाठी लागणारे फडके.

बाशी : शिळे.

डिबरा : भांड्यांना वाईट अर्थाने डिबरा म्हणतात.

*आजून माले डिबरा घसना शेतस.*

अनावश्यक मुलांच्या गर्दीलाही डिबरा म्हणतात. ह्या डिबरा आथास तरफडतस.

दयडं : दयडंचा खरा अर्थ खड्डा असा आहे. मोठा खड्डा. पण कोणाचा आहार जास्त असला तर त्याच्या पोटालाही दयडं म्हणतात. *त्यानं दयडं काही भरत नही लक्कर. रस्तामा दयडाच दयडा शेतस.*

घरोट : जाते. ज्याचा आवाज घरघर-घर्घर होतो आणि पीट देतो तो घरोट. घरोटवर दोन प्रकारचे आण्हे आहेत.

आण्हे : *कोयडी हेरमा वाग गुरगुरे. हरन पळे दुध गळे.*

*'दळे तिले कळे, फुकटी गोंडा घोळे.'* अशी म्हण आहे.

*'घरोट रे भाऊ नको जड जड जाऊ, बाजरीना मिसे मी दळस वल्ला गहू.'* ही ओवी

**वेळा**

पुल्हाळ : पुल्हाळ म्हणजे पहाट. उजाडून येणे. पूर्वेचे आभाळ उमलून-उलून येणे ती पुल्हाळ. फटफटी वनं असंही म्हणतात. *ऊठ वं, पुल्हाळ व्हयी गयी ना. फटफटी वनं ना, ऊठ. मी पुल्हाळेच निंघी गऊ वावरमा*

रामपहार : सकाळ. *रामपहाऱ्हेच गावले निंघी गया तो.*

तिसरापहार : तिसरी प्रहर. दिवस कलतो ती तिसरापहार. *मी तिसरापहारले यी लागसू.*

चिपडं : संध्याकाळ. सूर्यास्त झाल्यावरची संध्याकाळ. *मी वनथू तधळ चिपडं पडी गयथं.*

**दिवस**

सकाळ : उद्या. *मी तुन्हा पैसा सकाळ दि दिसू.*

कालदिस : काल. *आमनी पैरनी कालदिसस व्हयी गई.*

परोंदिस : परवा (झालेला). *तो परोंदिस यी गया मन्हाकडे*

परो : परवा (येणारा). *आपुले परो जानं शे बरका, ध्यानात ठेव.*

आदला दिवस : आधीचा दिवस.

मांगला दिवस : मागचा दिवस.

## दिशा

हेटे : पूर्वेला, खाली. तो हेट्या जायेल शे रे भाऊ. हायी हेटे गे. म्हण : *ज्यानी बेटी, त्यानी मान हेटी.*

वऱ्हा : पश्चिम. *गावना वऱ्हा गयास का तठेच शे त्यानं वावर*

सूर्याखाल : पूर्व-पश्चिम. *त्यानं घर सूर्याखालच शे.*

डोंगरखाल : दक्षिणोत्तर. *औत डोंगरखालच धर भो. मी डोंगरखालचा पैरस.*

## शेती व वनस्पती :

आवते : दोर, मोट, बैलगाडी, नांगर, शेल. विहिरीतील पाणी वा गाळ काढण्यासाठी लागणाऱ्या सर्व दोरांना आवते म्हणतात. त *थाइन येता येता आवते घी ये.*

इरीद : मासिक शुल्क. गायी, बकऱ्या रानात चारणाऱ्यांना जे मासिक शुल्क द्यावे लागते, त्याला इरीद म्हणतात. *मन्ही गाय इरीदखाल चराले लायी दिधी.*

किलचन : खानदेशात धाब्याची घरं असतात. लाकडाच्या छोट्या छोट्या तुकड्यांना किलच्या म्हणतात. अशा किलच्या कड्यांवर अंथरून वरून माती टाकून घराचे छत तयार करतात.

*किलचनना घरमुळे उंदरं भयान माटी पाडतंस.*

कुरधानं : शेतातल्या कामावर जाणाऱ्या माणसाबरोबर ज्या फडक्यात भाकर बांधून दिली जाते, त्याला कुरधानं म्हणतात. *कुरधानं सोडा चला म्हणजे जेऊन घेऊ चला.*

गदारं : गरम होणे, उष्ण होणे, उकडणे. *आज पाऊस यी बहुतेक, काय गदारं व्हयी रहायनं.*

गवांद : अधेली, दोन जणांचा भाग असलेले. हा शब्द शक्यतो शेती कामासाठी वापरला जातो. अर्ध्या वाट्याने कोणाला शेती करायला दिली तर हा शब्द वापरतात. *मन्ह वावर यंदा गवांदखाल दियेल शे.*

चिव्वळ : अरुंद. ची आवळ चा चिव्वळ झाला असावा. ची आवळ म्हणजे कोणाची तरी अशिष्ट बाब आवळ, या अर्थाने चिव्वळ शब्द भाषेत सुरुवातीला आला असावा. पुढे तो अरुंद अर्थाने भाषेत रूढ झाला. लहान वाट या अर्थाने सध्या हा शब्द रूढ आहे. *आथाइन बैलगाडी नही जानार, नुसती चिव्वळ वाट शे.*

जुआंडं : बैलांच्या मानेवर बैलगाडीचे जे आडवे लाकूड ठेवले जाते, ते जुआडं. जू. जोटं अशा शब्दांवरून जुआडं.

झोऱ्या : मोठ्या सतरंजीला झोर्‍या म्हणतात. झोऱ्या शक्यतो पांढऱ्या रंगाचा असतो. सतरंजी स्त्रीलिंगी तर झोऱ्या पुलिंगी. बैलगाडीत कापूस भरून विकायला घेऊन जाण्यासाठी झोऱ्याचा उपयोग होतो. मोठ्या कार्यक्रमात लोकांना बसण्यासाठीही जमिनीवर अंथरतात. *गल्लीमा दोनतीन झोऱ्या आथरात का काम व्हयी जाई.*

डालकं : मोठ्या कढईला-टोपलीला डाकलं म्हणतात. डालकं टोकरापासून बनवतात. डाकल्याने कचरा, शेण उकिरड्यावर फेकतात. *हाई सगळं शेण डालकावरी उखडावर फेकी दे.*

साबडं : साबडं डालक्यापेक्षा खूप मोठे असते. त्याच्यात बाजरीच्या बंग्या, गव्हाचे कुटार भरून लांब फेकता येते. खूप या अर्थाचे बोलण्यासाठीं साबडंभर हा शब्दप्रयोग वापरला जातो. *मी तुले साबडंभर पैसा दिसू उकाव.*

ढुब्ब : उंचवटा. ढुब्ब म्हणजे जमिनीपासून वर आलेला फुगीर भाग. पादींमा पानीमुळे आशा गाळ व्हयी गयी कनी. बैलगाडीस्न्या दोन चकारीसमुळे मधोमध कायमना ढुब्बा व्हयी गयात.

फफाटं : धूळ. बैलगाडी, गाड्या. जितराब (जनावर) रस्त्यावरून जाताना जी धूळ उडते, ते फफाटं. *काय फफाटानी पांदी शे माय.*

पांजडं : उसाच्या वाळलेल्या बांड्यांना पांजडं म्हणतात. झोपड्यांचे उतरते छत पांजडं टाकून शाकारतात.

फोत्र : सालटं. कोणत्याही फळाचे साल. शक्यतो भुईमुगाच्या शेंगांच्या सालाला फोत्र म्हणतात. किंमत नसलेल्या माणसालाही फोत्र म्हटले जाते. *त्याले फोत्रानागत कोनीच इचारत नाही.*

बमकाडनं : हाकलणे, जोरात हाकलण्याला बमकाडनं म्हणतात.
*त्यानी बैलगाडं आशे बमकाडं कनी. घोडा बमकाडा.*

बंग्या : बाजरीच्या कणसातून बाजरीचे दाणे काढल्यावर, प्रत्येक दाण्यासाठीचा जो पोकळ कचरा उरतो, त्या बंग्या. एकवचनी - बंगी, अनेकवचनी - बंग्या. *तठे बंग्यांस्ना गंज पडेल शे, तो उखडावर टाकी ये रे भाऊ.*

कुटार : गव्हाच्या काड्यांच्या बारीक तुकड्यांना कुटार म्हणतात. कुटार हे जितराबांचे खाद्यही असते. गव्हाच्या उणब्यांवर पात धरून, त्यानंतर च्याहूरवर उभे राहून, उपणून गहू बाजूला काढल्यावर कुटार पुढे उडून खाली पडते. दुष्काळात जितराबांचे खाद्य म्हणूनही हे उपयोगात आणतात. *हायी पपई कुटारमा पिकत घाली दे ते.*

बोखरी : बोखरी म्हणजे खराटा. मातीतला कचरा झाडण्यासाठी हा जाड काड्यांचा झाडू वापरतात. तो बोखरी या गवतापासून तयार झालेला असतो. म्हणून बोखरी. असे अनेक शब्द अहिराणीचे वेगळेपण लक्षात आणून देतात. ■

# ऐनापूर शिलालेखातील भाषाविशेष

नीलेश केदारी शेळके

कोणत्याही भाषेचा अभ्यास करत असताना आजची भाषा पूर्वी कशी होती, ती कशी बदलत गेली हा एक महत्त्वाचा घटक असतोच. मराठी भाषेच्या विकासक्रमात काही टप्पे केलेले आहेत. भाषेचा इतिहास हा त्या भाषेच्या अभ्यासाचा पाया असतो. भाषेची प्राचीन रूपे मिळवायची असतील तर ती ग्रंथांमधून आणि शिलालेखांमधूनच मिळतात. 'पैकी ग्रांथिक साधनांचा विचार करता प्राचीन मराठी ग्रंथांच्या पाठशुद्ध आवृत्त्यांची उणीव अजूनही जाणवते' असे शं०गो० तुळपुळे यांना वाटते. त्यांचे हे मत काही अंशी खरेही आहे. कारण जुन्या काळात या सर्व ग्रंथांचे संपादन करताना त्यात अनेक उणिवा राहून गेलेल्या आहेत. काहींचे पुष्कळच अर्वाचीनीकरण झालेले आहे. त्यामुळे ग्रंथांपेक्षा कोरीव लेखांचा उपयोग भाषाभ्यासात अधिक महत्त्वाचा ठरतो. कोरीव लेखांना 'काळ्या दगडावरची रेघ' म्हणून ओळखले जाते. त्यामुळे कोरीव लेखात आलेली भाषा ही त्या काळातीलच आहे, असे आपणास ठामपणे म्हणता येते. कारण त्या भाषेत त्यानंतर काहीही बदल झालेला नसतो. साहजिकच आपणांस अभ्यासासाठी त्यांचा अधिक उपयोग होतो.

कोरीव लेखांचा विचार करतानाही काही मर्यादा अगोदरच लक्षात घ्याव्या लागतात. दगडावर लेख कोरणारा जो कारागीर असतो तो कोणी विद्वान पंडित असत नाही, त्याचे भाषाज्ञान बेताचेच असते. त्यामुळे ही भाषा बरीच अशुद्धही असते; पण ही खरी भाषा आहे; याचे कारण असे की, लेख कोरणारे अशिक्षित असल्याने त्यांच्या व्यवहारातील भाषा; अर्थात बोलीभाषेतील अनेक रूपे आपणास या कोरीव लेखांतूनच मिळतात. या कारणाने भाषेच्या अभ्यासात कोरीव लेखांचे महत्त्व आहे.

कोल्हापूर जिल्ह्यातील गडहिंग्लज तालुक्यातील ऐनापूर या गावी एक यादवकालीन शिलालेख आहे. ऐनापूर या गावी शेतात काम सुरू असताना एका शेतात काही दगड, सतीची शिल्पे, गजलक्ष्मी शिल्प, गणेशमूर्ती आणि हा शिलालेख आदी गोष्टी मातीत गाडलेल्या अवस्थेत सापडल्या. मातीत गाडलेला असल्यामुळे या शिलालेखातील बरीच अक्षरे झिजलेली आहेत. या शिलालेखाचे प्रथम वाचन डॉ० हरिहर ठोसर आणि अ०ब० करवीरकर यांनी केले. ते राजवाडे संशोधन मंडळ, धुळे येथून प्रकाशित होणाऱ्या 'संशोधक' या त्रैमासिकाच्या सप्टेंबर १९९०च्या अंकात प्रसिद्ध झाले होते. या





अनुक्रमणिका

शोधनिबंधात त्यांनी शिलालेखासंबंधी सविस्तर विवेचन केलेले आहे. शिलालेखाच्या सतराव्या ओळीत काळाचा उल्लेख आलेला आहे, तर आठव्या ओळीत यादवराजा महादेवराव याचे नाव आलेले आहे. लेखात शके ११९२ शुक्ल संवत्संर वैशाखवद्य अमावस्या असा काळाचा स्पष्ट निर्देश आलेला आहे. 'तथापि गत पंचांगानुसार काल आणि संवत्सर नामाचा मेळ बसत नाही. कारण शुक्ल संवत्सर शके ११९१मध्ये आले होते. याउलट शके ११९२मध्ये प्रमोद संवत्सर होते. दक्षिणेत त्या काळी गतशक कालगणना पद्धती प्रचलित असल्यामुळे ही एक वर्षाची तफावत आली आहे. संवत्सर नामानुसार या शिलालेखाचा काळ शके ११९१ असा धरावा लागेल. इ०स० मध्ये तो १२६९ असा येईल.' (ठोसर, करवीरकर, १९९०:३४) म्हणजे हा शिलालेख ज्ञानेश्वरीच्या अगोदर बारा वर्षापूर्वी कोरलेला आहे. साहजिकच या काळातील ध्वनी, शब्द, अर्थ, वाक्य हे भाषेतील महत्त्वाचे घटक या लेखाच्या आधारे तपासता येतात. गडहिंग्लज तालुका हा कर्नाटकालगतचा असल्याने काही कन्नड भाषाविशेषही या लेखात सापडतात. डॉ० ठोसर, करवीरकर यांनी ह्या शिलालेखाचे ऐतिहासिक महत्त्व सांगितले होते. मी या लेखात त्या शिलालेखाच्या भाषिक वैशिष्ट्यांचा विचार करणार आहे. हा शिलालेख संमिश्र स्वरूपाचा आहे. या लेखातील प्रास्ताविक, कालनिर्देश, सत्ताधीश, नृपतीची बिरुदावली व लेखाचा शेवटचा भाग हा संस्कृत भाषेमध्ये आलेला आहे. लेखाची लिपी तेराव्या शतकातील देवनागरी आहे. यादवकाळातील हा लेख असल्यामुळे हा लेख ऐतिहासिकदृष्ट्या जसा महत्त्वाचा आहे, तसा भाषिकदृष्ट्याही महत्त्वाचा आहे. मराठी भाषेचा अभ्यास करायचा असेल तर तिचा सुरुवातीचा काळ म्हणजे यादवकाळ हा महत्त्वाचा काळ विचारात घ्यावाच लागतो.

### शिलालेखाचे वाचन

शिलालेखाची एकूण उंची ९५ सें०मी० आणि रुंदी ५५ सें०मी० आहे. वरच्या त्रिकोणी भागात सूर्य, चंद्र, गाय, वासरू, तलवार आणि विळा या आकृत्या कोरलेल्या आहेत. संपूर्ण लेखात २५ ओळी असून सुरुवातीच्या १९ ओळी मोठ्या अक्षरामध्ये आणि जागा अपुरी पडते असे लक्षात आल्यावर उर्वरित सहा ओळी लहान आकारामध्ये कोरण्यात आलेल्या आहेत. वर सांगितलेच आहे की या शिलालेखाचे प्रथम वाचन डॉ० हरिहर ठोसर आणि अ०ब० करवीरकर यांनी केले. शिलालेख खालीलप्रमाणे आहे -

( १ ) *श्रीगणाधिपतएनम:* ॥ नमस्तुंगशिरश्चुंबि चंद्र चामर चारवे त्रैलोक्य न

( २ ) *गरारंभा* मूलस्तंभाय संभवे ॥ स्वस्ति श्रीमआ {हा} स्ता {स्था}न समावासित श्री

( ३ ) मद्विजयकटके समधिगत पंचमहाशब्द महाराजाधिराज परमेश्वर द्वारावती

( ४ ) पुरवराधीश्वर विष्णुवंशोद्भव यादंव कुलज कलिका विकासभास्कर अरिराय

(५) जगझंप मालवियमल्ल अहितराय उरसेल्ल विभ्रांड बधिरक++++उत्पाटनकर

(६) गुर्जरवारुणांकुश श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ती श्रीप्रभुदेव राजविजय++++

(७) स्वस्तिश्री सकु ११९२ शुक्ल संवछरे वैशाखवद्य अमावस्याम्++ अधेह श्री

(८) मत्प्रौढप्रतापचक्रवर्ती श्रीमहादेवराज तत्पादपद्मोपजीवि श्रीहस्तिसा

(९) धनीक श्रीराजगुरू जोयनारायण विषालदेव ++++ रंवलदेवना

(१०) यके क्रिंत आग्रारे {अग्रहारे} कविलगे++++++++सीवेती नैव्रित्ये {नैऋत्ये} कोनि

(११) चाविरा वायाव्य (वायव्य) कोनी इंडीविगुतु +++++++++ईशान्य कोनी ते

(१२) य अमदी शीवंती असे ते शीवंती ++++++++++ ची पाणंदीरेखा

(१३) वरिआली वेटे घाघरूनु आग्निय {अग्नेय} कोनि सिंदवाघरी अमदी सीवंती असे

(१४) देववु सीवंत्येमाझारि निधिनिक्षेपदंडु दोषु आकंठक समस्ततेजसा

(१५) ध्य वंकक {वंकट} सुनु रवलदेवनायके महाजनादिद्विज++++सवितादाय

(१६) ++ ग ५० अंकोपितोपि गद्याण पंनास मंगलमहा श्रीश्रीश्री ००० रायराज

(१७) गुरू जोयनारायण विषालदेव त नम रवलदेवनायक सुक्षेम

(१८) स्त्रविज साम्यमुरम्यवागि सरवलिगेयनु पाणिपुर्वकं वागि

(१९) कविलगेय महाज (न) मंगलिगेकोटनु मंगलमहा श्रीश्रीश्री ०

(२०) बहुभिर्वसुधाभुक्ता राजभिः सगरादिभिर्यस्ययस्य यदा भूमि तस्य तस्य तदा फलं॥ गाण्यंते पांसवोभूमि गान्यंते व्रिष्टिबिंदवः न गन्यंते वि

(२१) धात्रापि धर्मरक्षणे फलं ॥ अपहरत ममर्यस्यास्य जीवस्य स्वदतां परदत्तां वा यो हरेती वसुंधरा सष्टिवर्श

(२२) सहस्त्रणी विष्टायां जायते क्रिमिं ॥ परदत्तातुयो भूमि मुपहिंसेत कदाचन । सबद्धो वारूणै पाशैः क्षिपयते पूयशोणिते कर्मणामन

(२३) सावाचा य समर्थोऽप्युपेक्षते । सभ्यस्तथैव सस्यात्तदै चांडाला सर्वधर्मबहिष्कृतः॥ सामान्योयं धर्मसेतु नृपाणां काले काले पालनीयो भ

(२४) विद्भः सर्वानेतान्माविनः पार्थिवेंद्रान् भूयो भूयो याचते रामचंद्रः ॥ मद्वंशजा परमहीपतिवंशजावा पापादपेत मनसो भुविभावि

(२५) भूपाः ॥ ये पालयन्ति ममधर्ममिमंसमस्तं तेभ्यो मया विरचितोजलिरेष मूर्ध्नि ॥

टीप : { }च्या ऐवजी हा शब्द असायला हवा,
() राहून गेलेले अक्षर, + वाचता न आलेली अक्षरे

शोधनिबंधात त्यांनी शिलालेखासंबंधी सविस्तर विवेचन केलेले आहे. शिलालेखाच्या सतराव्या ओळीत काळाचा उल्लेख आलेला आहे, तर आठव्या ओळीत यादवराजा महादेवराव याचे नांव आलेले आहे. लेखात शके ११९२ शुक्ल संवत्सर वैशाखवद्य अमावस्या असा काळाचा स्पष्ट निर्देश आलेला आहे. 'तथापि गत पंचांगानुसार काल आणि संवत्सर नामाचा मेळ बसत नाही. कारण शुक्ल संवत्सर शके ११९१मध्ये आले होते. याउलट शके ११९२मध्ये प्रमोद संवत्सर होते. दक्षिणेत त्या काळी गतशक कालगणना पद्धती प्रचलित असल्यामुळे ही एक वर्षाची तफावत आली आहे. संवत्सर नामानुसार या शिलालेखाचा काळ शके ११९१ असा धरावा लागेल. इ०स० मध्ये तो १२६९ असा येईल.' (ठोसर, करवीरकर, १९९०:३४) म्हणजे हा शिलालेख ज्ञानेश्वरीच्या अगोदर बारा वर्षापूर्वी कोरलेला आहे. साहजिकच या काळातील ध्वनी, शब्द, अर्थ, वाक्य हे भाषेतील महत्त्वाचे घटक या लेखाच्या आधारे तपासता येतात. गडहिंग्लज तालुका हा कर्नाटकालगतचा असल्याने काही कन्नड भाषाविशेषही या लेखात सापडतात. डॉ० ठोसर, करवीरकर यांनी ह्या शिलालेखाचे ऐतिहासिक महत्त्व सांगितले होते. मी या लेखात त्या शिलालेखाच्या भाषिक वैशिष्ट्यांचा विचार करणार आहे. हा शिलालेख संमिश्र स्वरूपाचा आहे. या लेखातील प्रास्ताविक, कालनिर्देश, सत्ताधीश, नृपतीची बिरुदावली व लेखाचा शेवटचा भाग हा संस्कृत भाषेमध्ये आलेला आहे. लेखाची लिपी तेराव्या शतकातील देवनागरी आहे. यादवकाळातील हा लेख असल्यामुळे हा लेख ऐतिहासिकदृष्ट्या जसा महत्त्वाचा आहे, तसा भाषिकदृष्ट्याही महत्त्वाचा आहे. मराठी भाषेचा अभ्यास करायचा असेल तर तिचा सुरुवातीचा काळ म्हणजे यादवकाळ हा महत्त्वाचा काळ विचारात घ्यावाच लागतो.

### शिलालेखाचे वाचन

शिलालेखाची एकूण उंची ९५ सें०मी० आणि रुंदी ५५ सें०मी० आहे. वरच्या त्रिकोणी भागात सूर्य, चंद्र, गाय, वासरू, तलवार आणि विळा या आकृत्या कोरलेल्या आहेत. संपूर्ण लेखात २५ ओळी असून सुरुवातीच्या १९ ओळी मोठ्या अक्षरामध्ये आणि जागा अपुरी पडते असे लक्षात आल्यावर उर्वरित सहा ओळी लहान आकारामध्ये कोरण्यात आलेल्या आहेत. वर सांगितलेच आहे की या शिलालेखाचे प्रथम वाचन डॉ० हरिहर ठोसर आणि अ०ब० करवीरकर यांनी केले. शिलालेख खालीलप्रमाणे आहे -

( १ ) श्रीगणाधिपतएनमः ॥ नमस्तुंगशिरश्चुंबि चंद्र चामर चारवे त्रैलोक्य न

( २ ) गरारंभा मूलस्तंभाय संभवे ॥ स्वस्ति श्रीमआ {हा} स्ता {स्था}न समावासित श्री

( ३ ) मद्विजयकटके समधिगत पंचमहाशब्द महाराजाधिराज परमेश्वर द्वारावती

( ४ ) पुरवराधीश्वर विष्णुवंशोद्भव यादव कुलज कलिका विकासभास्कर अरिराय

(५) जगझंप मालवियमल्ल अहितराय उरसेल्ल विभ्रांड बधिरक++++उत्पाटनकर

(६) गुर्जरवारुणांकुश श्रीमत्प्रौढप्रतापचक्रवर्ती श्रीप्रभुदेव राजविजय++++

(७) स्वस्तिश्री सकु ११९२ शुक्ल संवछरे वैशाखवद्य अमावस्याम्++ अधेह श्री

(८) मत्प्रौढप्रतापचक्रवर्ती श्रीमहादेवराज तत्पादपद्मोपजीवि श्रीहस्तिसा

(९) धनीक श्रीराजगुरू जोयनारायण विषालदेव ++++ रंवलदेवना

(१०) यके क्रिंत आग्रारे {अग्रहारे} कविलगे++++++++सीवेती नैव्रित्ये {नैऋत्ये} कोनि

(११) चाविरा वायाव्य (वायव्य) कोनी इंडीविगुतु +++++++++ईशान्य कोनी ते

(१२) य अमदी शीवंती असे ते शीवंती ++++++++++ ची पाणंदीरेखा

(१३) वरिआली वेटे घाघरूनु आग्निय {अग्नेय} कोनि सिंदवाघरी अमदी सीवंती असे

(१४) देववु सीवंत्येमाझारि निधिनिक्षेपदंडु दोषु आकंठक समस्ततेजसा

(१५) ध्य वंकक {वंकट} सुनु रवलदेवनायके महाजनादिद्विज++++सवितादाय

(१६) ++ ग ५० अंकोपितोपि गद्याण पंनास मंगलमहा श्रीश्रीश्री ००० रायराज

(१७) गुरू जोयनारायण विषालदेव त नम रवलदेवनायक सुक्षेम

(१८) स्त्रविज साम्यमुरम्यवागि सरवलिगेयनु पाणिपुर्वकं वागि

(१९) कविलगेय महाज (न) मंगलिगेकोटनु मंगलमहा श्रीश्रीश्री ०

(२०) बहुभिर्वसुधाभुक्ता राजभिः सगरादिभिर्यस्ययस्य यदा भूमि तस्य तस्य तदा फलं॥ गाण्यंते पांसवोभूमि गान्यंते व्रिष्टिबिंदवः न गन्यंते वि

(२१) धात्रापि धर्मरक्षणे फलं ॥ अपहरत ममर्यस्यास्य जीवस्य स्वदतां परदत्तां वा यो ह्रेती वसुंधरा सष्टिवर्श

(२२) सहस्त्रणी विष्टायां जायते क्रिमिं ॥ परदत्तातुयो भूमि मुपहिंसेत कदाचन । सबद्धो वारूणै पाशैः क्षिपयते पूयशोणिते कर्मणामन

(२३) सावाचा य समर्थोऽप्युपेक्षते । सभ्यस्तथैव सस्यात्तदै चांडाला सर्वधर्मबहिष्कृतः॥ सामान्योयं धर्मसेतु नृपाणां काले काले पालनीयो भ

(२४) विद्भः सर्वानेतान्माविनः पार्थिवेंद्रान् भूयो भूयो याचते रामचंद्रः ॥ मद्वंशजा परमहीपतिवंशजावा पापादपेत मनसो भुविभावि

(२५) भूपाः ॥ ये पालयन्ति ममधर्ममिमंसमस्तं तेभ्यो मया विरचितोजलिरेष मूर्ध्नि ॥

टीप : { }च्या ऐवजी हा शब्द असायला हवा,
() राहून गेलेले अक्षर, + वाचता न आलेली अक्षरे

---

**शिलालेखातील भाषाविशेष**

( १ ) अपभ्रंश भाषांमध्ये अंत्य स्वरांचे ऱ्हस्वीकरण झालेले आहे. हा शिलालेख यादव-कालीन असल्यामुळे येथेही अंत्य स्वरांचे ऱ्हस्वीकरण झालेले आहे.

कोनिं, अंकेपितोपि, घाघरुनु, देवबु, माझारि, वागि, सवरलिगेयनु, निधिनिक्षेपदंडु, दोषु, मंगलिगेकोटनु.

( २ ) संस्कृतमध्ये तालव्य व्यंजनेच आहेत; पण मराठीत दंततालव्य व्यंजनेही आहेत. ती यादवकाळातही रूढ होती.

जोयनारायण, चाविरा, माझारि.

( ३ ) प्राकृत-अपभ्रंश भाषांमध्ये लोप पावलेली किंवा 'स' रूप झालेली 'श, ष' हे उष्मे मराठीत पुन्हा रूढ झालेली दिसतात.

विषालदेव, ईशान्य (तत्सम), शीवंती, दोषु.

( ४ ) 'ऋ' हा ध्वनी तत्सम शब्दातच राहिलेला दिसतो. तद्‌भव शब्दात त्यांची 'अ-इ-उ' याप्रमाणे निरनिराळी रूपे झालेली दिसतात.

नैर्ऋत्य - नैव्रित्य, कृत - क्रित

( ५ ) 'य'युक्त संयोग - 'य'चा संयोग होत असताना बऱ्याचदा स्पर्श व्यंजनेच प्रभावी ठरलेली आहेत आणि 'य' त्यांच्याशी एकरूप झालेला आहे. त्यामुळे 'य'चा हा वेगळा संयोग या शिलालेखातही सापडतो.

योगनारायण या शब्दाचे अपभ्रंश रूप 'जोयनारायण' असे झाले आहे. (आणखी काही शिलालेखाव्यतिरिक्तची उदाहरणे देता येतील; योग्य-जोगे, शक्य-सकणे, रौप्य-रुपे, ज्योतिषी-जोईसि, व्याघ्र-वाघ.)

( ६ ) 'व' हा अर्धस्वर यादवकालीन मराठीत आद्यस्थानी संस्कृत 'व'पासून किंवा प्राकृत 'व'पासून आला आहे. वक्र (संस्कृत) त्यापासून वंकट.

( ७ ) शब्दयोगी - साधित विभक्तिरूप

नामांना शब्दयोगी अव्ययाची जोड होऊन सर्व विभक्त्यांची रूपे तयार होताना दिसतात. (षष्ठी सोडून) ती होताना मूळ प्रातिपदिकाचे सामान्यरूप तयार होते व त्या सामान्यरूपाला शब्दयोगी अव्यये लागतात.

माझारि - सीवंत्ये माझारि

हे शब्दयोगी अव्यय कोरीव लेखात जसे आढळते तसे ते पुढे ग्रंथांमध्येही आढळते. पारंबियामाझारि (ज्ञानेश्वरी १५ अध्याय ओवी क्र० ५८), पोळीमाझारिं (रुक्मिणीस्वयंवर ८७४), ब्राह्मणामाझारि (उद्धवगीता ७१८), तिहीलोकांमाझारि (धवळे पूर्वार्ध ४२)

( ८ ) ग्रामनामाची विशिष्ट पद्धती : कविलगे, सरवलिगे मंगलिगेकोटनु.

( ९ ) कन्नड भाषेचा परिणाम

गडहिंग्लज तालुका हा कर्नाटकाशी लगतचा असल्याने आणि तालुक्यातील अनेक लोकांची बोली कन्नड असल्याने काही कानडी विशेष या शिलालेखातही दिसतात. यादवकाळातील मराठीत 'उ'काराचे प्राबल्य द्रविडीच्या संपर्कामुळे आले आहे. (Caldwell R., 1875 : 17-18) घाघरुनु, देवु, निधिनिक्षेपदंडु, दोषु, सुनु, सरवलिगेयनु, मंगलिगेकोटनु.

(१०) संख्यालेखन - संख्यालेखन अंक व अक्षरी अशा दोन्हीही पद्धतीने केलेले दिसते. ५० - पंनास.

(११) अयोग्य शब्दतोड : रंवलदेवना-यके, ते-य, समस्ततेजसा-ध्य, रायराज-गुरु, न-गरारंभा, श्रीहस्तसा-धनीक, वि-धात्रापि असे काही शब्द.

(१२) लेखनदोष - शिलालेख कोरणारे अशिक्षित असल्यामुळे काही लेखनदोषही आढळतात.

(अ) ऱ्हस्व-दीर्घातील अनियमितता : कोनि-कोनी-कोनि (ओळ १०-११-१३)

(आ) स्वरांचे अनिश्चित लेखन : आग्रारे-अग्रहारे, आग्निय-अग्नेय.

(इ) अनुस्वार योजनेतील अनियमितता : रंवलदेवनायके-रवलदेवनायके (ओळ ९-१७)

(ई) लेखनातील अपभ्रष्ट रूप : संवत्सरे-संवछरे

(उ) लेखनातील हस्तदोष : वायाव्य-वायव्य, महाज-महाजन, वंकक-वंकट, शीवंती-सीवंती.

भाषाभ्यासाच्या दृष्टीने हा शिलालेख कितीही महत्त्वाचा असला तरी आज तो ज्या अवस्थेत आहे ते पाहून मन उद्विग्न होते. हा शिलालेख खूप वर्षे मातीत माडला गेलेला असल्यामुळे आज त्यावरची अनेक अक्षरे अस्पष्ट झाली आहेत. सध्या तो गावाबाहेरच्या गणेश मंदिराच्या बाह्यमंडपात आहे; पण केवळ ठेवायचा म्हणून ठेवला आहे. स्त्रिया त्यावर तेल वाहताहेत; हळदकुंकू लावताहेत. असाच तेल आणि हळदकुंकू यांचा मारा सुरू राहिला तर काही दिवसानंतर आज जेवढी दिसतात तेवढीही अक्षरे दिसणार नाहीत. पुरातत्त्व विभागाने याकडे लक्ष देऊन जतन करण्यासाठी प्रयत्न करायला हवेत.

**संदर्भ :**

मराठी : ( १ ) ठोसर हरिहर, करवीरकर अ०ब०, यादव नरेश महादेवरायाचा ऐनापूर, शिलालेख, 'संशोधक', धुळे. १९९०.

( २ ) तुळपुळे, शं०गो०, 'यादवकालीन मराठी भाषा', व्हीनस, पुणे. १९७३.

इंग्रजी : ( ३ ) Caldwell R., A Comparative Grammar of Dravidian Languages. 1875.

■

# झुंजार सामंतबाई

**दिवाकर मोहनी**

सामंतबाईंची आणि माझी ओळख अंदाजे तीस वर्षांपूर्वीची. १९८४-८५चा सुमार असावा. मी त्या वेळी नुकतेच भाषाविषयक लेख लिहायला सुरुवात केली होती. भाषा संचालनालयातले माझे मित्र मधुकर जोशी ह्यांना माझे लेख मी दाखवले तेव्हा ते म्हणाले, नागपूरला सेशन होईल तेव्हा सामंतबाई येतील, त्या वेळी तुमची त्यांच्याशी गाठ घालून देतो.

पहिल्याच भेटीत मी त्यांना डॉ० द०भि० कुलकर्णी ह्यांच्या घरी घेऊन गेलो. ते तेव्हा आमच्याच गल्लीत राहात होते. त्या दोघांची आधीपासून ओळख होती. मी मुंबईला गेलो की त्यांच्या ऑफिसमध्ये जाऊन सामंतबाईंची भेट हमखास घेत असे.

त्यांनी भाषेविषयी काही लिहिले की त्या मला ते पाठवीत आणि मी काही लिहिले की मी ते त्यांना पाठवीत असे. त्यावर आम्ही मतप्रदर्शन करीत असू. मुंबईला त्यांची प्रकृती ठीक राहीना म्हणून त्यांनी आपले बिऱ्हाड पुण्याला हलविले, तेव्हा त्यांचा पुण्याचा पत्ता त्यांनी सविस्तर पत्र पाठवून मला समजावून दिला होता. माझ्या त्यांच्याशी जशा पुष्कळ भेटी होऊ लागल्या तशी त्यांची गुणाढ्यता माझ्या लक्षात येऊ लागली आणि आमचा स्नेह दाट होऊ लागला. मी त्यांना शीलाताई म्हणू लागलो. पुण्याला त्यांच्या घरी क्वचित काही इतर मोठी मंडळी असत, त्या त्यांच्याशी माझी ओळख करून देत. श्री० कानेटकर, स०ह० देशपांडे अशांची भेट त्यांच्याकडे झालेली आहे. पुढे टेलिफोनवर बोलणे सोपे झाल्यावर आम्ही आठवड्यातून एकदा तरी एकमेकांशी बोलत असू.

'बालभारती' वापरत असलेल्या जोडाक्षर पद्धतीला त्यांनी 'तोडाक्षर पद्धती' असे रास्त नाव दिले होते. ती लेखनपद्धती सदोष असून ताबडतोब बदलायला पाहिजे आणि जुनी जोडाक्षरपद्धतीच वापरायला पाहिजे ह्याबद्दल आमचे एकमत होते. त्यांच्या ठिकाणी माझ्यात नसलेला एक उपजत लढाऊपणा होता. त्या स्वभावापोटी त्यांनी मोठाच लढा उभारला. त्यांनी त्यासाठी अक्षरशः जिवाचे रान केले. पत्रव्यवहार केला, गाठीभेटी घेतल्या, भाषणे दिली, लेख लिहिले. काहीच करायचे शिल्लक ठेवले नाही. त्या जे जे काही करतील त्याचा वृत्तान्त त्या मला पत्राने किंवा फोन करून ताबडतोब कळवीत असत; इतकेच नव्हे तर मी काय करायला हवे तेही मला सुचवीत असत. त्यांच्या 'शब्दानंदा'चे काम चालले असताना मी माझ्याजवळचे एकदोन कोशही त्यांना दिले

होते. आम्ही एकमेकांशी घरगुती बोलत असू.

एप्रिलमध्ये त्यांनी मला आपण पडलो कसे, त्यावर कोणते इलाज होत आहेत हे सर्व फोनवर सांगितले होते. त्या मला एकदा थोड्या चिंताग्रस्त वाटल्या, पण फिजिओथेरपिस्ट येऊन गेल्यावर त्यांची काळजी दूर झाली होती. एक मे या दिवशी ऑपरेशन करायचे ठरले तेही मला त्यांनी सांगितले होते. त्यांचे दुखणे काही फार गुंतागुंतीचे नव्हते. त्यामुळे सर्व नीट होणार असे मी अर्थातच धरून चाललो होतो. त्यांचे पती अप्पा ह्यांच्या फोनची मी अपेक्षा करीत होतो तेव्हा त्यांच्याऐवजी मला विजय पाध्ये ह्यांचा फोन आला आणि मी स्तंभितच झालो. माझी जिवाभावाची मैत्रीण अशी निघून केली ह्यावर माझा विश्वास बसेना. मनाला विलक्षण चटका लावून त्या गेल्या.

आम्हा दोघांनाही मराठीच्या लेखननियमांविषयी अतिशय आस्था. माझा सैद्धान्तिक मांडणीकडे कल तर त्यांचा अंमलबजावणीकडे. येथेच आमच्यामधल्या सहमतीच्या आणि असहमतीच्या मुद्द्यांबद्दल सांगून टाकतो.

देवनागरीतील जोडाक्षरांची रचना कशी पूर्णतया तर्कशुद्ध आहे हे माझ्या लक्षात आल्यानंतर मी त्यावर अनेक लेख लिहिले. (ह्या बाबतीत त्या माझ्याशी सहमत होत्या.) मी त्यासाठी अनेक लेख लिहिले, आपल्या लिपीची तर्कशुद्धता समजावून सांगण्यासाठी काही साधने बनविली. अगदी अलीकडे ॲनिमेशनच्या साह्याने एक दृक्-श्राव्य सी०डी०सुद्धा बनविली. तिच्यात मराठीचे संधिनियमसुद्धा सोपे करून समजावले आहेत. ती त्यांना अतिशय आवडली. तिचा प्रचार-प्रसार करण्यासाठी व तिला राजमान्यता मिळवून देण्यासाठी त्यांनी अतोनात प्रयत्न केले. शासनदरबारी ती परीक्षणार्थ स्वीकारली जावी एवढ्याचसाठी आमच्या शीलाताईंनी इतके परिश्रम केले, माझ्या वतीने शिक्षणविभागात इतके खेटे घातले की ते पाहूनच मी थक्क होऊन गेलो. माझी कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी, त्यांचा उतराई होण्यासाठी आता, त्यांच्यामागे, त्यांचे जाहीर आभार मानण्यापलीकडे मी काहीच करू शकत नाही.

सहमतीचा मुद्दा देवनागरीचा. देवनागरीतील जोडाक्षरांबद्दलचा. बालभारतीची तोडाक्षरपद्धती आम्हांला दोघांनाही का अमान्य होती ते सांगतो. आपल्या लिपीची रचना अतिशय तर्कशुद्ध आहे. तिच्या रचनेत मला एकही अपवाद आढळला नाही. ती ज्या नियमाने बांधली गेली आहे तो नियम असा : बोलताना वा कोणत्याही वर्णाचा उच्चार करताना आपण प्रत्येक व्यञ्जनाला स्वराचा आधार देतो त्याचप्रमाणे लिहितानासुद्धा प्रत्येक व्यञ्जनचिन्हाला स्वरचिन्हाचा आधार देणे आवश्यक अहे. म्हणून एका स्वराच्या आधाराने उच्चारल्या जाणाऱ्या सर्व व्यञ्जनांच्या चिन्हांना एकाच स्वरचिन्हाचा आधार दिला गेला पाहिजे. व्यञ्जनचिन्हे आणि स्वरचिन्हे एकमेकांना चिकटवूनच लिहिली गेली पाहिजेत. फक्त वाक्याच्या शेवटी येणारे व्यञ्जन पाय मोडून म्हणजे हलन्त चिन्हाने





अनुक्रमणिका

लिहावयाचे असते; कारण त्याच्यानंतर कोणताही स्वर येणार नसतो. शब्दाच्या प्रारंभी किंवा मध्यंतरी आलेले व्यञ्जन पुढच्या स्वरचिन्हाला जोडावेच लागते. देवनागरी ह्या नियमाने बांधली गेली असल्यामुळे उद्योत, वक्र, प्लुत, दिङ्मूढ अशी जोडाक्षरे निर्माण केली गेली. बालभारतीने तोडाक्षरे वापरू नयेत असा आम्ही आग्रह धरला; त्याचे कारण त्यांची अक्षरे तर्कशुद्ध नाहीत एवढेच नव्हते आणि नाही. बालभारती सोडून मराठीतले दुसरे कोणतेही प्रकाशक (महाराष्ट्र शासनसुद्धा) ती तोडाक्षरे वापरीत नाहीत. येथे मुलांच्या डोळ्यांना झालेल्या किंवा करावयाच्या सवयींचा संबंध आहे. बालभारतीच्या पाठ्य-पुस्तकांमुळे एका प्रकारच्या तोडाक्षरांची डोळ्यांना सवय झाल्यानंतर दुसरे काहीही वाचावयाचें झाल्यास मुलांनी निराळ्या जोडाक्षरांची सवय करावयाची हे शिक्षणशास्त्राच्या कोणत्या नियमांत बसते, ते आम्हांला समजत नव्हते. एकाच पानावर संस्कृत आणि मराठी वाक्ये आल्यास संस्कृत मजकुरात जोडाक्षरांचा आणि मराठी मजकुरात तोडाक्षरांचा वापर बालभारती करते, हे पाहून आम्ही दोघेही हतबद्ध होत असू. असे करण्यामागचे त्यांचे (बालभारतीचे) तर्कशास्त्रच आम्हांला कळत नसे. वाचनात गती येण्यासाठी पुढे येणारे शब्द कोणते असणार आणि त्यांमधली जोडाक्षरे कशी असणार ह्याची पूर्वकल्पना करता येणे आवश्यक असते. सगळे छापील शब्द कसे logotype सारखे, म्हणजे सगळीकडे एकाच तऱ्हेने लिहिलेले, पूर्वपरिचित असले की प्रत्येक वेळी ते नुसते डोळे फिरवून, ओझरते पाहून, वाचता येतात. ते पाठ्यपुस्तकात वेगळे आणि इतर पुस्तकांत वेगळे असले की नजर थबकते. त्यांच्याकडे निरखून पाहावे लागते. बालभारतीच्या धोरणामुळे सामान्य मुलांचे नुकसान होत आहे हे आम्हांला दिसत होते. ते बालभारतीला कसे समजावून द्यायचे हा प्रश्न अजून सुटला नाही. बालभारतीच्या हटवादीपणापुढे हात टेकल्यानंतर शीलाताईंनी महाराष्ट्र शासनाचे दरवाजे ठोठावले. तीनचार वर्षे त्यांच्याशी अविरत पत्रव्यवहार, शिष्टमंडळे, भेटीगाठी करून झाल्यावर महाराष्ट्र शासनाने जोडाक्षरांच्या विषयी एक शासननिर्णय प्रसृत केला. (असा शासननिर्णय झाल्यामुळे आम्हांला जरा हायसे वाटले होते...पण कसचे काय!) तो घेऊन श्रीमती सत्त्वशीला सामंत बालभारतीकडे गेल्या. तो शासननिर्णय झाल्याला आज तीन वर्षे झाली. पण... महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तकनिर्मिती आणि अभ्यासक्रम संशोधन मंडळ जागचे हलायला तयार नाही. आमचा आग्रह पूर्ण महाराष्ट्रभरात एकाच प्रकारची जोडाक्षरे वापरली जावी असा, आणि माझा ज्या जोडाक्षरांची लेखनपद्धती तर्काधिष्ठित आहे त्यांनाच प्रमाणीकृत करावे, टाइपरायटरच्या मोजक्या कळींवर बसवलेल्या वर्णांचा वापर आता कॉम्प्युटर उपलब्ध झाल्यावर पुरे! हा, लेखनाच्या प्रमाणीकरणाचा (standardisation) लाभ अभ्यासक्रम संशोधन मंडळाला का समजत नाही; हे गूढ आम्हांला उकलत नाही.

तोडाक्षरांविषयीची आमची भूमिका वर मांडून झाली. आता शुद्धलेखननियमांविषयी

थोडक्यात सांगतो. तेथे आमचा थोडा मतभेद होता. काल जसा पुढे सरकतो तसा, त्या स्वाभाविक गतीने, भाषेच्या लेखनात सावकाश फरक पडत असतो आणि त्यामुळे लेखननियमांत तो फरक दिसायला हरकत नाही, असे शीलाताईंचे मत होते. भाषेत फरक पडतो हे मला मान्य होते. पण तो फरक शब्दांच्या निवडीमध्ये पडेल किंवा पूर्वी आम्ही करावयाचे असे लिहित होतो त्याऐवजी आता करायचे असे लिहू हे मला मान्यच होते; पण ऱ्हस्वाचे दीर्घ करणे, अर्थभेद दर्शविणारे अनुस्वार काढून टाकणे मला पटत नव्हते, अजूनही पटत नाही. मराठीच्या आद्य शिलालेखांपैकी एका, श्रवणबेळगोळा येथील, शिलालेखात 'इये चावुंडरायें करवियलें' असे शब्द आहेत. तेथे हे अनुच्चारित अनुस्वार आजही, अंदाजे सातशे वर्षांनंतर स्पष्ट दिसतात. त्या लेखात ती टिंबे घातली गेली ह्याचा अर्थ त्यांचा वापर लेखनात पूर्वीपासून होत असला पाहिजे. ती आमची सातशे-आठशे वर्षांची परंपरा आम्ही का मोडून टाकायची, हे माझ्या आकलनाच्या पलीकडे आहे. लेखन देशकाल ओलांडून जात असते. म्हणून त्याने उच्चारांपेक्षा अर्थ दाखविण्यावर भर दिला पाहिजे. पूर्वीसारखे पुढेही लिहिले गेले तरच त्या लिखित शब्दांत अर्थसातत्य राहते आणि ''तीं तीं पदें नित्य फिरोनि येतीं, त्या त्याच अर्थाप्रति दावितातीं'' हे कविवचन खरे ठरते असे माझे मत होते आणि आजही कायम आहे. असो. शीलाताईंच्या व्यक्तिगत आठवणींबरोबर ह्याही आठवणी मनात भडभडून आल्या.

शीलाताईंच्या परिचयामुळे आणि त्यांच्या सहवासामुळे माझे आयुष्य खूप संपन्न झाले. त्या माझ्या गुरू होत्या किंवा फारतर असे म्हणा की आम्ही परस्परांचे गुरू होतो. मी त्यांच्यापेक्षा चौदापंधरा वर्षांनी मोठा. मला त्यांच्या अशा आठवणी लिहाव्या लागतील असे कधीच वाटले नव्हते.

■

### ग्रंथसंग्राहक इयान फ्लेमिंग

इयान फ्लेमिंगची ओळख जेम्स बॉण्डचा जनक अशीच आहे, पण याहीपलीकडे त्याची ग्रंथसंग्राहक अशीही एक वेगळी ओळख आहे. फ्लेमिंगचा ग्रंथसंग्रह केवळ एखाद्या धनाढ्य व्यक्तीने छंद म्हणून जोपासलेला नाहीय. १९५२ साली फ्लेमिंगने पर्सी म्यूरच्या साहाय्याने 'द बुक कलेक्टर' नावाचं एक त्रैमासिक सुरू केलं. ते अजूनही चालू आहे; आणि पुस्तक-संग्रहाच्या क्षेत्रातलं ते एक अभिजात नियतकालिक मानलं जातं.

जयप्रकाश सावंत, 'महाराष्ट्र टाइम्स', २६ मे २०१३

# यार, नाखुदा, कैसर आणि शहानशहा

मो० गो० धडफळे

दिवंगत देवीसिंग चौहान हे अरबी, फार्सी, मराठी, पेहलवी, अवेस्ता, वेदसाहित्य यांचे प्रकांड पंडित होते. त्यांचे अमृतलेखन मला शिरसावंद्य आहे. क्वचितच मला त्यांचे काहीच थोडेबहुत शब्दार्थनिरूपण पटत नाही.

या अपवादांचाच निर्देश या लघुलेखात करीत आहे.

**यार :** चौहान म्हणतात, आजच्या हिंदीतील 'यार' (मित्र, स्नेही) हा शब्द. नव्य-फार्सीतून आला आहे. हे योग्य आहे. पण पुढे जाऊन ते म्हणतात की, नव-फार्सीत हा शब्द यहुदनिष्ठ फार्सीतील (म्हणजे ज्यू लोकांच्या सेमेटिक भाषेतील) अयार आणि झरथुष्ट्रीय पहलीवीतील (मध्य फार्सी) अदियावार या शब्दापासून निपजतो. ('भारत-इराणी संश्लेष', देवीसिंग चौहान. पृ० ४७)

मला हे काहीसे दूरान्वयाचे (far fetched) वाटते. माझ्या मताने वैदिक 'जार' (अहल्याया: जार:) या शब्दावरून तो हिंदीत आला आहे. 'ज' या वैदिक वर्णाचे हिंदीत 'य' असे रूप होते. ज व य हे एकमेकांची जागा घेतात.

पहा : योगेश्वरी-जोगेश्वरी, संयोग-संजोग, सूर्य-सूर्ज-सूरज: त्याचप्रमाणे जार > यार.

**नाखुदा** : देवीसिंग चौहान यांचे या शब्दार्थाविषयीचे मत मला पूर्णपणे पटले आहे. नाखुदा या शब्दाऐवजी कदंब वंशातल्या पहिल्या जयकेशी राजाच्या पणजी येथे आढळलेल्या ताम्रपटात 'नौवित्तक' असे विशेषण आलेले आहे. मो०गं० दीक्षित (दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने' खंड ४. १८७३). दीक्षितांनी त्याचा 'नौ (नाव, जहाज) हेच ज्याचे वित्त (धन) आहे' असा सुयोग्यच अर्थ केला आहे. पुढे इतिहासाचार्य राजवाडे यांनी त्यांच्या निधनापूर्वी दोन वर्षे 'महिकावतीची बखर' संपादित केली. भारताच्या पश्चिम किनारपट्टीवर विशेषत: मलबार, कर्नाटक इत्यादी ठिकाणी मुस्लीम नौकापतींना 'नवाईत' हा शब्द वापरत असत. 'नाखवा' शब्द मराठीत सर्रास तर संस्कृतसाहित्यात क्वचितच वापरला गेला आहे.

'ना-खवा'मधील 'ना', हे 'नौ' (नाव) ह्या शब्दाचे संक्षिप्त रूप आहे, तर 'खवा' हा 'खुदा' (स्वामी, मालक) शब्दाचा त्रुटित अवशेष आहे. मात्र हा 'खुदा' असूनही

सेमेटिक भाषेतील नाही. ते सरळसरळ वैदिक 'स्वधा' या शब्दाचे अपभ्रष्ट रूप आहे. स्वधा (स्वविधि).

चौहान यांनी याप्रमाणे अतिशय योग्य असे निरूपण 'नाखुदा' या शब्दाचे केलेले आहे. अनभिज्ञ वाचकांच्या उपयोगासाठी मी ते केवळ उद्‌धृत केले आहे. यात माझे 'योगदान' शून्य.

**कैसर (सीझर) :** चौहान म्हणतात (पृ०४५) की, प्राचीन इराणात कयान हा राजवंश होता. ठीक आहे. आज भारतातील पार्सी समाजात कयानी (उदा० कयानी-बेकरी) हे आडनाव येते. (यास्काच्या भाषेत 'अर्धनाम' या वंशाची मायभूमी खुरासान, नैर्ऋत्य अफगाणिस्थान असल्यामुळे कैसर हा शब्द सीझर (क >< स. सिर्का-चिर्का circa, सिसेरो किसारो cicero) याचेच रूप संभवते, हे चौहानांचे मत मला पूर्णपणे पटते. पण का कोणास ठाउक, एवढे मोठे भाषाभिज्ञ चौहान इथेच थांबले. वस्तुतः त्यांनी कैसर-सीझरचे संस्कृत प्रतिरूपही (cognate form) सांगावयास हवे होते. माझ्या मताने वेदसूक्तातील 'कविः कविनाम्' यातील 'कवि' म्हणजे ईराणी 'कयि', 'कैनी', 'कयानी', राजवंश. हे 'कवि' अवेस्तामध्ये लबाडपणासाठी प्रसिद्ध आहेत. यांच्यापासून मराठीत 'कावा' (कावेबाज) हा शब्द आला आहे. माझे जर्मनतज्ज्ञ स्नेही डॉ० प्रमोद तलगेरी नेहेमी गमतीने The British ruled India by Poetry (ब्रिटिशांनी काव्याने (कावा, काव्य नव्हे) असे उदाहरण देत असतात. यासाठीच संस्कृतात काव्यः ('काव्यम्' नव्हे) म्हणजे असुरगुरू शुक्र. तो कोणाच्या पोटात शिरून विद्या शिकायची हा 'कावा' जाणत होता. थोडक्यात 'कवि' या संस्कृत शब्दाचा अर्थ काव्य करणारा, ज्ञानी व त्याचप्रमाणे 'लबाड' (कावेबाज) असाही आहे. अशा लबाडांचा राजा म्हणजे कवीश्वर (समर्थ म्हणतात त्याप्रमाणे 'शब्दसृष्टीचे ईश्वर' नव्हेत.) या कवीश्वरचे कइसर, कैसर व सीझर असे रूप झाले असा माझा दावा आहे. भाषातज्ज्ञांनी प्रतिवाद करायला माझी काहीच हरकत नाही.

**शहे(हा)नशाहा :** चौहान शब्दाचे लेखन 'शान्शाह' असे करतात. त्यांच्या मते तो मूळ फार्सी शब्द असून त्याचा अर्थ 'राजांचा राजा - सम्राट' असा आहे. (पृ० ४०). अर्थ अगदी बरोबर आहे. पण शब्द मुळात फार्सीतला आहे, हे मला पटत नाही.

चौहान यांचे म्हणणे असे की, या शब्दाचा इतिहास सुमारे २,५०० (अडीच हजार) वर्षांचा आहे. हखामनी राजवंशातला राजा दारयवहु (Darivs) याने ही उपाधी स्वतःसाठी वापरली आहे. खरे आहे; पण यामुळे या शब्दाचे कूळ फार्सी कसे मानता येईल?

त्याही पूर्वीचा म्हणजे पाच हजार वर्षांपूर्वीचा ऋग्वेद आहे. त्यातील एका सूक्तात 'शासामुग्रः मन्यमानो जिघांसति' (शासकांच्यातील सर्वात वरचा असे स्वतःला मानणारा

मारण्याची इच्छा करतो.) असा 'शासां'चा उल्लेख आहे. ऋग्वेदातील 'स' हा अवेस्ता-फार्सीत 'ह' होतो. (सप्तसिंधु - हप्तहिंदु, सोम हओम, सप्ताह-हपत्ता इ०) 'शासां' हे 'शास्'चे षष्ठीचे बहुवचनाचे रूप आहे. आता 'शासां शाः' याचे फार्सीत साहजिकच जे रूप होईल ते 'शाहां शाह्' अर्थात उच्चारात 'शहानशाह' असेच होणार. थोडक्यात हा शब्द, फार्सी कुळीचा नसून शुद्ध वैदिक गोत्रातला आहे. इति वयम्!

मात्र आदरणीय चौहान दाखला देतात तो डॉ० आर०जी० केन्ट यांनी संपादित केलेल्या लेखांच्या संहितेचा. केन्ट यांच्या मतानिशी चौहान असहमत आहेत. केन्ट म्हणतो, ख्वाव्यथियानां ख्यायथिय ही शब्दसंहती संस्कृतातील 'क्षत्रियाणां क्षत्रियः' याचे फार्सी प्रतिरूप नाही. हे मला पटते; पण प्रस्तुतचा प्रश्न 'शाहान्शाह' विषयीचा आहे. तोलमान मात्र (ग्रे. परिच्छेद ३४६, ४८८) शाहन्शाह हा 'क्षत्रियाणां क्षत्रियः' याचे फार्सी प्रतिरूप मानतात व चौहान हे मान्य करतात. मला मात्र 'शाहन्शाह' हे वैदिक 'शासां शाः' असेच केवळ वाटते. भाषातज्ज्ञांनी माझी मते पारखावीत; 'धडफळेबाबा वाक्यं प्रमाणम्' अशी त्यांची धारणा नसावी.

■

**कट्ट कडकट्ट कट्ट...**

तार हे भारतीयांच्या गेल्या दीडशे वर्षांच्या समाजजीवनातील एक अतिशय हळवे आणि गंभीर असे प्रकरण राहिले आहे. येत्या महिन्याभरात पूर्णविराम मिळणाऱ्या या तारेने मागच्याच पिढीपर्यंतच्या कोट्यवधींना तातडीच्या संपर्कात राहण्याचे साधन दिले आणि त्यांच्या जगण्याचा वेग किंचितसा वाढवण्याचा प्रयत्नही केला. अहोरात्र जागे राहणारे तार खाते म्हणजे त्या काळातल्या तंत्रज्ञानाचा जिवंत आविष्कार होते. सॅम्युअल मोर्स या अमेरिकन वैज्ञानिकाने शोध लावलेले हे तंत्रज्ञान म्हणजे एक प्रकारची गुप्त भाषा होती. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी विजेच्या साहाय्याने एका यंत्राद्वारे विशिष्ट आवाज पोहोचवले जात. त्या आवाजावरून शब्द ओळखणे हे काम तार खात्यातील कुशल कर्मचाऱ्यांनाच जमायचे. कट्ट कट्ट कडकट्ट कट्ट अशा प्रकारचे आवाज करणारे हे यंत्र म्हणजे कुतूहलाचे केंद्र असे. मोर्सने हे तंत्रज्ञान निर्माण करण्यासाठी घटनाही तशीच घडली. त्याच्या प्रिय पत्नीच्या निधनाची बातमी त्याला वेळेत मिळाली नाही. आपले जे झाले, ते इतरांचे होऊ नये, या उदात्त हेतूने तो प्रयत्नाला लागला आणि हे यंत्र बरोबर एकशे पंचाहत्तर वर्षांपूर्वी अवतरले.

संपादकीय, 'लोकसत्ता' शनिवार १५ जून २०१३

# 'पखालपार्वती'

मागील पिढीच्या तोंडी चुकूनमाकून 'पखाल पार्वती' हा शब्द यायचा हे आपल्यापैकी काही जणांना तरी माहीत असेल. हा शब्द निंदाव्यंजक असून तो स्थूल प्रकृतीच्या, आडदांड महिलेला उद्देशून वापरला जायचा.

पखाल आणि पार्वती ह्या दोन शब्दांचा एकमेकांशी काय संबंध असावा? ह्या शब्दाची घडण कशी झाली असावी? पखाल म्हणजे पाणी घेऊन जाण्यासाठी वापरली जाणारी मोठी चामड्याची पिशवी. कृ०पां० कुलकर्ण्यांच्या व्युत्पत्तिकोशात त्या शब्दाचे मूळ संस्कृत प्र+खल्ल (म्हणजे चामड्याची पिशवी) असे दिले आहे. इतर भारतीय भाषांमध्येही पखाल हा शब्द रूढ असल्याचंही नोंदलं गेलं आहे.

मग पार्वती, म्हणजे महिलेचा प्रातिनिधिक उल्लेख म्हणून वापरलेला शब्द असा अर्थ घेऊन विशेषण म्हणून पखाल हा शब्द योजला गेला असेल, तर त्या शब्दाचे मूळ संस्कृतमधले पृथुल (= विशाल, रुंद) हे असू शकेल काय?

**विजय पाध्ये**

**'पखाल' आणि 'पखालपार्वती'**

१. दाते-कर्वे यांचा *महाराष्ट्र शब्दकोश* (१९३२) या कोशात 'पखालपार्वती' हा शब्द 'पखाल' या नोंदीमध्ये दिलेला आहे. (अर्थ 'ढेरपोटी स्त्री').

'पखाल'ची व्युत्पत्ती संस्कृत पयस् + खल्ल = चामडे अशी दिली आहे.

या शब्दाचे तीन अर्थ पुढीलप्रमाणे दिले आहेत : (अ) पाणी आणण्या-नेण्याची, बैलाच्या पाठीवरून नेण्याची कातडी मोठी पडशी, पिशवी; (आ) मोट; (इ) (लक्षणेने) ढेरपोट, दोंदील.

२. वि०का० राजवाडे यांच्या व्युत्पत्ती कोशात (१९४३) 'पखाल'ची व्युत्पत्ती संस्कृत 'प्रधारिका= पखाल', अशी दिली आहे. अर्थ 'मुतणारी मुलगी' असा दिला आहे. दोन्ही बाबतींत ही नोंद फारच विचित्र वाटते.

३. R.S. McGregor यांच्या *The Oxford Hindi-English Dictionary* (१९९३) या कोशात 'पखालपार्वती' हा शब्द नाही. परंतु 'पखाल' या शब्दावर दोन वेगळ्या नोंदी आहेत. म्हणजे येथे प्रत्यक्षात दोन वेगळे शब्द आहेत असे कोशकारांचे म्हणणे आहे:





अनुक्रमणिका

'पखाल' १, हे स्त्रीलिंगी नाम हिंदीच्या पश्चिमी बोलीतील म्हणून दिले आहे. त्याची hypothetical (म्हणजे अनिश्चित स्वरूपाची) व्युत्पत्ती pakshakhallaa- यावरून दिली आहे.

या शब्दाचे दोन अर्थ दिलेले आहेत: (अ) a large water-bag (carried by bullocks); (आ) one side of a bellows

**'पखाल' २,** हे पुल्लिंगी नाम बोली वापरातले म्हणूनच दिले आहे. त्याची व्युत्पत्ती prakshaala- यावरून दिली आहे.

या शब्दाचे दोन अर्थ दिलेले आहेत: (अ) mud, dirt, rubbish; (आ) dysentery.

**मिलिंद मालशे**

वि०का० राजवाड्यांचा व्युत्पत्तिकोश महाजालावर उपलब्ध आहे काय? म्हणजे आपण तो उपयुक्त किंवा विश्वासार्ह संदर्भस्रोत म्हणून नव्हे परंतु विरंगुळा म्हणून पाहायला उपयोगी पडेल. 'हे कसले फायलॉलजिस्ट, हे तर फाजिलॉलजिस्ट' असं त्यांच्या बाबतीत कुणीसं म्हटलं होतं ते मला आठवलं म्हणून लिहिलं आहे. आणि मुतणारी मुलगी वगैरेसारखा भलतीकडेच नेऊन अर्थ देणारी व्युत्पत्ती सांगणारा कोश असेल तर तो आपण कशाला पाहावा!

प्रक्षाल ह्याचा सरळसुलभ अर्थ धुणे ('काकडा झाला आता मुख प्रक्षाळा') असा होत नाही काय? मग prakshaala- (अ) mud, dirt, rubbish; (आ) dysentery हे अर्थदेखील आपल्याला भलतीकडेच घेऊन जातायत असं दिसतं.

**विजय पाध्ये**

विजय, तुमचं म्हणणं बरोबर आहे. व्युत्पत्तीच्या बाबतीत खूपच काळजीपूर्वक अभ्यास व्हायला हवा. भाषिक परिवर्तन नियमाधिष्ठित असते असे सुस्पष्टपणे सिद्ध करता यायला हवे. ऐतिहासिक भाषाशास्त्राची मराठीतील परिस्थिती फार केविलवाणी आहे. राजवाडे अतिशय विक्षिप्त होते आणि त्यांचा कोश याची साक्ष पटवितो. कृ०पां० कुलकर्णी यांच्या कोशातही अनेक व्युत्पत्ती (व्युत्पत्त्या?) ओढून ताणून लावलेल्या आहेत. त्यांना ऐतिहासिक भाषाशास्त्राचा आधार नाही. अलीकडे संस्कृत-मराठी-तमिळ (सं-म-त) यांचा संबंध जोडणाऱ्या विश्वनाथ खैरे यांच्या लेखनाविषयीसुद्धा हेच म्हणता येईल. मी येथे आता उदाहरणे न घेताच विधाने करतो आहे. परंतु उदाहरणे शोधायला फार प्रयास पडणार नाहीत, याची मला खात्री आहे.

इंग्लिशशी तुलना नाही करायची म्हटली तरी अशा ज्ञानात्मक बाबींसाठी तुलना जरूर करावी. विकिपीडियामध्ये *The Oxford Dictionary of English Etymology* च्या पुढील आवृत्त्यांचा उल्लेख सापडतो:

C. T. Onions, G. W. S. Friedrichsen, R. W. Burchfield (1966, reprinted 1983, 1992, 1994) ISBN 0-19-861112-9

The Concise Oxford Dictionary of English language T. F. Hoad (1986) T. F. Hoad (1993) ISBN 0-19-283098-8

An Etymological Dictionary of the English Language
W. W. Skeat (1963) ISBN 0-19-863104-9

माझे वडील स०गं० मालशे यांच्या संग्रहात Ernest Weekley यांचा *A Concise Etymological Dictionary of Modern English* (1924) हा जुना कोश होता, तो आजही उपयुक्त आहे. मी Eric Partridge यांचा *Origins: A Short Etymological Dictionary of Modern English* (1965) हा अप्रतिम कोश वापरतो.

या कोशाच्या प्रारंभीच विल्यम कूपर (१७३१-१८००) या इंग्लिश कवीच्या Retirement (१७८२) या काव्यातील चरण उद्‌धृत केलेले आहेत. ते अत्यंत मार्मिक आहेत:

*Philologists, who chase*
*A panting syllable through time and space,*
*Start it at home, and hunt it in the dark*
*To Gaul, to Greece, and into Noah's ark.*

(Lines 691...)

**मिलिंद मालशे**

'पखाल' या सारख्या शब्दांची व्युत्पत्ती शोधताना महत्त्वाची गोष्ट ध्यानात ठेवायला हवी की मराठीत येणारे तद्भव शब्द हे एकदम संस्कृतभाषेतून आलेले नसून मराठीची पूर्वरूपे असलेल्या प्राकृत व अपभ्रंश भाषांमधून आलेले आहेत. राजवाडे हे देखील बहुतेक वेळा भाषिक इतिहासाच्या मधल्या या अवस्था गाळून मराठीपासून एकदम संस्कृताकडे धाव घेतात. 'पखाल' याची मुळे प्राकृत-अपभ्रंशात शोधू लागल्यावर असे लगेच ध्यानात येईल की दोन-तीन वेगळे संस्कृत शब्द प्राकृत-अपभ्रंशात तेच रूप धारण करतात. संस्कृत प्रक्षालयति, प्रस्खलति, प्रक्षरति या वेगळ्या शब्दांची प्राकृत-अपभ्रंशात पक्खल/पक्खाल/पक्खर/पग्घर/पग्घल अशी रूपे दिसू लागतात, व त्यामुळे प्राकृत-अपभ्रंशात व्युत्पत्तीच्या फरकामुळे एका शब्दरूपाचे अनेक

अर्थ होऊ लागतात. पाणी वाहून आणण्याची पखाल ही प्रक्षालय- या धातूपासून आलेली दिसते, तर पखालपार्वतीमधली पखाल ही प्रस्खल/प्रक्षर या धातूपासून आलेली असू शकते. या सारखे दुसरे उदाहरण म्हणजे मराठी 'पुसणे' हे संस्कृत स्पृशति आणि पृच्छति या वेगळ्या धातूंपासून आलेले आहे, व म्हणून त्याचे दोन वेगळे अर्थ होतात. पाली भाषेत संस्कृत 'स्पृशति' याचे 'फुसति' असे रूप दिसते, व त्यावरून पुढे 'पुसणे' हा मराठी प्रयोग आलेला आहे. मराठीच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या मंडळींनी प्राकृत-पाली-अपभ्रंश या भाषांकडे दुर्लक्ष करून चालणार नाही, कारण मराठी भाषेचे मूळ एकदम संस्कृतभाषा नसून या मध्यकालीन भाषांमध्ये आहे.

**माधव देशपांडे**

माधव, अत्यंत चपखल उदाहरणे घेऊन 'आधुनिक' मराठी आणि मध्यकालीन भाषा (प्राकृत व अपभ्रंश) यांचा संबंध तपासणे किती महत्त्वाचे आहे, हा मुद्दा तुझ्या छोट्याशा विपत्रामधून चांगला ठसला. मनापासून आभार.

मराठी आणि इतर आधुनिक इंडो-आर्य (वा इंडिक) भाषांचे ऐतिहासिक तत्त्वांच्या साहाय्याने कोश रचले जातील (dictionaries on Historical Principles) तेव्हा या मधल्या 'स्थिती' आणि त्यांतली स्थित्यंतरे यांच्यावर अधिक प्रकाश पडेल.

भाषाविज्ञान, संस्कृत आणि आधुनिक भाषांचे विभाग या विद्यापीठीय विभागांनी एकत्र येऊन या प्रकारचे philological प्रकल्प हाती घेणे आवश्यक आहे. दुर्दैवाने एका बाजूला भाषांचे हे विभाग 'साहित्याचे आणि समीक्षेचे अध्यापन' करण्याच्या आपल्या पारंपरिक भूमिकेला घट्ट चिकटून बसलेले दिसतात व त्यामुळे भाषिक अभ्यास (भाषेचा इतिहास, भाषेचे वेगवेगळ्या पातळ्यांवरील अध्यापन, इ०) हद्दपार झालेला आहे. दुसऱ्या बाजूला भाषाविज्ञानाच्या विभागात ऐतिहासिक अभ्यास पूर्णपणे हद्दपार झालेला दिसतो.

**मिलिंद मालशे**

माधव देशपांडे सरांचा मुद्दा महत्त्वाचा आहे तो पटला. याच मुद्द्याला अनुसरून मला एक शंका विचारावीशी वाटते.

ज्याप्रमाणे मराठीत संस्कृतमधून शब्द आले तसे प्राकृत भाषेतील शब्द संस्कृतमधे गेले असतील का? ही शंका मनात यायचे कारण 'वागुर' हा शब्द फासेपारधी वापरतात. लघुगीर्वाण कोशात वागुरा म्हणजे फास, जाळे असा अर्थ दिला आहे. तसेच वागुरावृत्तिः म्हणजे पारधी असं म्हटलंय. गंमत अशी की फासे पारधी हे हजारो वर्षांपासून जाळ्याचा किंवा फाशाचा उपयोग शिकारीसाठी करत आले आहेत; किंबहुना जाळे हे त्यांच्या जीवनाचे अविभाज्य अंगच बनले आहे. तेव्हा फाशाला शब्द काय

असा प्रश्न ते कुणा संस्कृत पंडिताला विचारायला जाणार नाहीत, एवढेच नव्हे तर संस्कृत भाषा असलेल्या संस्कृतीचाही ते कधी भाग नव्हते. त्यामुळे वागुर हा शब्द त्यांच्या भाषेत फार पूर्वीपासून रूढ असावा आणि तो संस्कृत पंडितांनी जसाच्या तसा उचलला असावा, अशी मला शंका येते. तज्ज्ञांनी निरसन करावे.

**उमेश करंबेळकर**

माधवरावांच्याच 'संस्कृत आणि प्राकृत भाषा' ह्या ग्रंथातल्या 'संस्कृत आणि प्राकृत - भाषिक व सामाजिक संबंध' ह्या प्रकरणातला एक अंश उद्धृत करतो, म्हणजे उमेशरावांच्या पृच्छेला 'आगाऊ' उत्तर दिल्यासारखे होईल. माधवराव देशपांड्यांनी म्हटले आहे -

'संस्कृत' या शब्दाचा अर्थ कालिदासाच्या शब्दात म्हणजे 'संस्कारवती' भाषा असा आहे यात मला शंका वाटत नाही, आणि 'प्राकृत' हा शब्द मुळात नैसर्गिक भाषा या अर्थाने वापरलेला आहे असेही माझे स्वत:चे मत आहे. जैनग्रंथांमध्ये 'पयडी' म्हणजे 'प्रकृती' हा शब्द 'मूळ स्वभाव, स्वरूप' या अर्थाने येतो. 'प्राकृत' या शब्दाला जर 'खालच्या दर्जाची भाषा' असा अर्थ मुळात असता, तर हा शब्द प्राकृत भाषा वापरणाऱ्या मंडळींनी स्वत:च्या भाषेला लावला नसता. परंतु 'प्राकृत' हा शब्द जैनांनी आणि 'पाली' हा शब्द बौद्धांनी त्यांच्या प्राकृत भाषांना लावलेला दिसतो.

भाषाविज्ञान क्षेत्रातले तज्ज्ञ आपापली विवेचने सादर करतीलच, परंतु सर्वसामान्य माणसांचा प्रतिनिधी म्हणून मी असे म्हणू शकतो की प्रकृति म्हणजे जर निसर्ग तर प्राकृत म्हणजे नैसर्गिक असलेली तीच भाषा संस्कृतपेक्षाही आधीची असणार आणि अशा अनेक भाषांना, त्या नैसर्गिक असल्यामुळे जे काटेकोर नेमनियम वगैरे नव्हते ते भाषा-अभ्यासकांनी व्याकरणादि व्यवस्था लावून जी भाषा सुसंस्कारित केली, तिला संस्कृत हे नाव देऊन नटवले. वागुरा म्हणजे जाळे असा शब्द आजही फासेपारधी त्याच अर्थाने आपल्या व्यवहारात वापरतात, तसा उदाहरणादाखल लमाण किंवा अहिराणी भाषेमधला एक शब्द सांगतो - गंदोरे. गंदोरे म्हणजे लग्न, विवाहसंस्कार. ह्याच गंदोरे शब्दापासून सुसंस्कारित शब्द झाला गांधर्व (विवाह).

आपल्याकडे देशावर झाडू, झाडणी, केरसुणी हे सर्व शब्द झाडणे, केर काढणे ह्या क्रियेशी संबंधित असल्याने अमराठी माणसाला केर काढण्याच्या साधनाचा अर्थबोध व्हायला अडचण येत नाही. परंतु कोकणात तुम्हांला सर्रास 'वाढवण' हा शब्द कानावर पडेल. वाढवण म्हणजेही केरसुणीच. बराच काळ मी ह्या वाढवण शब्दाचा केराशी काय संबंध आहे ह्याचा शोध घेत होतो. अन विरंगुळ्याचे वाचन म्हणून एकदा संस्कृत-इंग्रजी-मराठी-गुजराती शब्दकोश चाळत बसलो असताना मला एक शब्द सापडला. तो

अर्थ होऊ लागतात. पाणी वाहून आणण्याची पखाल ही प्रक्षालय- या धातूपासून आलेली दिसते, तर पखालपार्वतीमधली पखाल ही प्रस्खल/प्रक्षर या धातूपासून आलेली असू शकते. या सारखे दुसरे उदाहरण म्हणजे मराठी 'पुसणे' हे संस्कृत स्पृशति आणि पृच्छति या वेगळ्या धातूंपासून आलेले आहे, व म्हणून त्याचे दोन वेगळे अर्थ होतात. पाली भाषेत संस्कृत 'स्पृशति' याचे 'फुसति' असे रूप दिसते, व त्यावरून पुढे 'पुसणे' हा मराठी प्रयोग आलेला आहे. मराठीच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या मंडळींनी प्राकृत-पाली-अपभ्रंश या भाषांकडे दुर्लक्ष करून चालणार नाही, कारण मराठी भाषेचे मूळ एकदम संस्कृतभाषा नसून या मध्यकालीन भाषांमध्ये आहे.

**माधव देशपांडे**

माधव, अत्यंत चपखल उदाहरणे घेऊन 'आधुनिक' मराठी आणि मध्यकालीन भाषा (प्राकृत व अपभ्रंश) यांचा संबंध तपासणे किती महत्त्वाचे आहे, हा मुद्दा तुझ्या छोट्याशा विपत्रामधून चांगला ठसला. मनापासून आभार.

मराठी आणि इतर आधुनिक इंडो-आर्य (वा इंडिक) भाषांचे ऐतिहासिक तत्त्वांच्या साहाय्याने कोश रचले जातील (dictionaries on Historical Principles) तेव्हा या मधल्या 'स्थिती' आणि त्यांतली स्थित्यंतरे यांच्यावर अधिक प्रकाश पडेल.

भाषाविज्ञान, संस्कृत आणि आधुनिक भाषांचे विभाग या विद्यापीठीय विभागांनी एकत्र येऊन या प्रकारचे philological प्रकल्प हाती घेणे आवश्यक आहे. दुर्दैवाने एका बाजूला भाषांचे हे विभाग 'साहित्याचे आणि समीक्षेचे अध्यापन' करण्याच्या आपल्या पारंपरिक भूमिकेला घट्ट चिकटून बसलेले दिसतात व त्यामुळे भाषिक अभ्यास (भाषेचा इतिहास, भाषेचे वेगवेगळ्या पातळ्यांवरील अध्यापन, इ०) हद्दपार झालेला आहे. दुसऱ्या बाजूला भाषाविज्ञानाच्या विभागात ऐतिहासिक अभ्यास पूर्णपणे हद्दपार झालेला दिसतो.

**मिलिंद मालशे**

माधव देशपांडे सरांचा मुद्दा महत्त्वाचा आहे तो पटला. याच मुद्द्याला अनुसरून मला एक शंका विचारावीशी वाटते.

ज्याप्रमाणे मराठीत संस्कृतमधून शब्द आले तसे प्राकृत भाषेतील शब्द संस्कृतमधे गेले असतील का? ही शंका मनात यायचे कारण 'वागुर' हा शब्द फासेपारधी वापरतात. लघुगीर्वाण कोशात वागुरा म्हणजे फास, जाळे असा अर्थ दिला आहे. तसेच वागुरावृत्तिः म्हणजे पारधी असं म्हटलंय. गंमत अशी की फासे पारधी हे हजारो वर्षांपासून जाळ्याचा किंवा फाशाचा उपयोग शिकारीसाठी करत आले आहेत; किंबहुना जाळे हे त्यांच्या जीवनाचे अविभाज्य अंगच बनले आहे. तेव्हा फाशाला शब्द काय

असा प्रश्न ते कुणा संस्कृत पंडिताला विचारायला जाणार नाहीत, एवढेच नव्हे तर संस्कृत भाषा असलेल्या संस्कृतीचाही ते कधी भाग नव्हते. त्यामुळे वागुर हा शब्द त्यांच्या भाषेत फार पूर्वीपासून रूढ असावा आणि तो संस्कृत पंडितांनी जसाच्या तसा उचलला असावा, अशी मला शंका येते. तज्ज्ञांनी निरसन करावे.

**उमेश करंबेळकर**

माधवरावांच्याच 'संस्कृत आणि प्राकृत भाषा' ह्या ग्रंथातल्या 'संस्कृत आणि प्राकृत - भाषिक व सामाजिक संबंध' ह्या प्रकरणातला एक अंश उद्धृत करतो, म्हणजे उमेशरावांच्या पृच्छेला 'आगाऊ' उत्तर दिल्यासारखे होईल. माधवराव देशपांड्यांनी म्हटले आहे -

'संस्कृत' या शब्दाचा अर्थ कालिदासाच्या शब्दात म्हणजे 'संस्कारवती' भाषा असा आहे यात मला शंका वाटत नाही, आणि 'प्राकृत' हा शब्द मुळात नैसर्गिक भाषा या अर्थाने वापरलेला आहे असेही माझे स्वतःचे मत आहे. जैनग्रंथांमध्ये 'पयडी' म्हणजे 'प्रकृती' हा शब्द 'मूळ स्वभाव, स्वरूप' या अर्थाने येतो. 'प्राकृत' या शब्दाला जर 'खालच्या दर्जाची भाषा' असा अर्थ मुळात असता, तर हा शब्द प्राकृत भाषा वापरणाऱ्या मंडळींनी स्वतःच्या भाषेला लावला नसता. परंतु 'प्राकृत' हा शब्द जैनांनी आणि 'पाली' हा शब्द बौद्धांनी त्यांच्या प्राकृत भाषांना लावलेला दिसतो.

भाषाविज्ञान क्षेत्रातले तज्ज्ञ आपापली विवेचने सादर करतीलच, परंतु सर्वसामान्य माणसांचा प्रतिनिधी म्हणून मी असे म्हणू शकतो की प्रकृति म्हणजे जर निसर्ग तर प्राकृत म्हणजे नैसर्गिक असलेली तीच भाषा संस्कृतपेक्षाही आधीची असणार आणि अशा अनेक भाषांना, त्या नैसर्गिक असल्यामुळे जे काटेकोर नेमनियम वगैरे नव्हते ते भाषा-अभ्यासकांनी व्याकरणादि व्यवस्था लावून जी भाषा सुसंस्कारित केली, तिला संस्कृत हे नाव देऊन नटवले. वागुरा म्हणजे जाळे असा शब्द आजही फासेपारधी त्याच अर्थाने आपल्या व्यवहारात वापरतात, तसा उदाहरणादाखल लमाण किंवा अहिराणी भाषेमधला एक शब्द सांगतो - गंदोरे. गंदोरे म्हणजे लग्न, विवाहसंस्कार. ह्याच गंदोरे शब्दापासून सुसंस्कारित शब्द झाला गांधर्व (विवाह).

आपल्याकडे देशावर झाडू, झाडणी, केरसुणी हे सर्व शब्द झाडणे, केर काढणे ह्या क्रियेशी संबंधित असल्याने अमराठी माणसाला केर काढण्याच्या साधनाचा अर्थबोध व्हायला अडचण येत नाही. परंतु कोकणात तुम्हांला सर्रास 'वाढवण' हा शब्द कानावर पडेल. वाढवण म्हणजेही केरसुणीच. बराच काळ मी ह्या वाढवण शब्दाचा केराशी काय संबंध आहे ह्याचा शोध घेत होतो. अन विरंगुळ्याचे वाचन म्हणून एकदा संस्कृत-इंग्रजी-मराठी-गुजराती शब्दकोश चाळत बसलो असताना मला एक शब्द सापडला. तो

म्हणजे वर्धनी. वर्धनी म्हणजे केरसुणी असा अर्थ दिलेला आढळला. आता वाढवणीवर संस्कार घडवून वर्धनी तयार झाली की वर्धनीचे सुलभीकरण करून कोकणी लोकांनी तिची वाढवण केली ते काम आपण भाषावैज्ञानिकांवर सोपवूया!

**विजय पाध्ये**

तुमचा प्रश्न अगदी बरोबर आहे. जसे संस्कृत शब्दांची तत्सम किंवा अपभ्रष्ट रूपे प्राकृत-अपभ्रंश भाषांमध्ये गेली आहेत, तसेच काही शब्दांनी उलट्या दिशेने प्रवास केलेला आहे. उदाहरणार्थ संस्कृत 'गृह' शब्दाची 'घर' आणि 'गेह' ही दोन रूपे प्राकृतभाषांमध्ये दिसतात. त्यातला 'गेह' शब्द पुन्हा संस्कृतात शिरला. 'भर्तृ' या शब्दाचे पुंलिंगी 'भट्टा' व स्त्रीलिंगी 'भट्टिणी' अशी प्राकृत रूपे झाली, पण त्यातले 'भट्टिनी' पुन्हा संस्कृतात शिरलेले दिसते. 'मयूर', 'नीर', 'फल' हे संस्कृत शब्द द्राविडी भाषांतून आले असावेत असा अंदाज प्रा० साउथवर्थ यांनी केला आहे, तर मुंडा-संताळ भाषांमधून संस्कृतात आलेल्या शब्दांचा अभ्यास प्रा० कुइपर यांनी केला आहे. या ही पूर्वीच्या कालखंडात जाऊन इंडो-इरानियन भाषा मध्यआशियातून प्रवास करताना त्यांच्यात शिरलेल्या स्थानिक शब्दांचा अभ्यास ल्युबॉटस्की यांनी केला आहे. सर्व कालखंडांमध्ये भाषिक देवाणघेवाण ही चालूच असते. मराठी भटजींनी लिहिलेल्या संस्कृत विवाहप्रयोगांमध्ये 'साखरपुडाख्यं कर्म करिष्ये' अशी मिश्र भाषा दिसते, तर काही तंत्रग्रंथांमध्ये 'खाहि खाहि मम शत्रून्' अशा वाक्यांमध्ये संस्कृत 'खाद्' धातूचा प्राकृत 'खा' धातू होऊन तो पुन्हा संस्कृतात आकारान्त धातूच्या रूपाने शिरून 'पाहि' या सारखे 'खाहि' हे रूप झालेले दिसते.

**माधव देशपांडे**

**नैसर्गिक घटिते आणि नियमव्यवस्था**

१. विजय पाध्ये यांच्या विपत्रामधील माधव देशपांडे यांचे उद्धृत एका परिच्छेदापुरतेच मर्यादित आहे. पुढील दोन परिच्छेद विजय पाध्ये यांचे स्वत:चे आहेत. अवतरण चिन्हे वापरली असती तर ते स्पष्ट झाले असते.

२. विजय यांचे विचार माधव देशपांडे यांच्या विवेचनाशी जुळतात का, याविषयी मला शंका आहे. अर्थात विजय यांनी आपले 'वाचन' (reading, interpretation) स्पष्टपणे मांडले हे महत्त्वाचे आहे.

३. मला थोडासा वेगळा मुद्दा या संदर्भात उपस्थित करायचा आहे:

'...अनेक भाषांना, त्या नैसर्गिक असल्यामुळे जे काटेकोर नेमनियम वगैरे नव्हते ते भाषा-अभ्यासकांनी व्याकरणादि व्यवस्था लावून जी भाषा सुसंस्कारित केली, तिला संस्कृत हे नाव देऊन नटवले.'

विजय यांच्या या विधानाविषयी मी साशंक आहे. 'नैसर्गिक' गोष्टींना 'काटेकोर नेमनियम' नसतात, हे जर मान्य केले तर आधुनिक 'नैसर्गिक' विज्ञानांचा (Natural Sciences) संपूर्ण प्रकल्पच मोडीत निघतो. निसर्गातील घटितांमागचे नियम शोधणे हे आधुनिक विज्ञानाचे मूलभूत उद्दिष्ट आहे.

४. याच तत्त्वाचा विस्तार आधुनिक भाषाविज्ञानामध्ये झालेला आहे. मानवाच्या सर्व 'नैसर्गिक' वर्तनामागे (भाषा, बोली, उच्चारणे या घटितांचा अंतर्भाव यात होतो) सुनिश्चित नियम असतातच, त्याशिवाय मानवी व्यवहारच शक्य होणार नाहीत.

५. भाषांना/बोलींना व्याकरणादी व्यवस्था लावून सुसंस्कारित करावे लागत नाही! 'सुसंस्कारित-असंस्कारित' हा प्रत्यक्ष भाषिक/भाषावैज्ञानिक भेद नव्हेच. तो भाषाविषयक दृष्टिकोनांतून, भाषिक व सांस्कृतिक 'राजकारणा'तून, निर्माण झालेला भेद आहे. 'अमक्या-तमक्या भाषेला/बोलीला व्याकरणच नाही, त्यामुळे ती सुसंस्कारित नाही' या प्रकारची विधाने त्यामुळेच 'अशास्त्रीय'/'अवैज्ञानिक' ठरतात.

६. या प्रकारच्या विधानांना 'लोक-दृष्टिकोन व्यक्त करणारी विधाने' (statements expressing folk attitudes) असे म्हटले पाहिजे. व्युत्पत्तीच्या चर्चेतही scientific/ rule-based etymology आणि folk etymology यांत भेद केला जातो. सर्वसामान्य सामाजिक धारणा आणि वैज्ञानिक धारणा यांमध्ये भेद असतो/असू शकतो, असे आधुनिक विज्ञान मानते.

७. माधव देशपांडे यांनी मांडलेले मुद्दे लक्षात घेता 'संस्कृत' व 'प्राकृत' यांचे अर्थ कसे लावले जात होते, म्हणजेच त्यांच्याविषयी कोणते दृष्टिकोन लोकांच्या मनात होते, याविषयी ते विवेचन करीत आहेत, हे स्पष्ट दिसते. त्यांनी याच लेखात स्वत:च्या १९७९मध्ये प्रसिद्ध झालेल्या इंग्लिश पुस्तकाचा उल्लेख केला आहे. या ग्रंथाचे शीर्षक Sociolinguistic Attitudes in India : A Historical Reconstruction असे आहे, हेही लक्षात ठेवायला हवे.

**मिलिंद मालशे**

**भाषिक घटिते, वैज्ञानिक/शास्त्रीय भूमिका आणि भाषाविषयक दृष्टिकोन : माधव देशपांडे यांची भूमिका**

विजय पाध्ये यांनी माधव देशपांडे यांच्या 'संस्कृत आणि प्राकृत भाषा : व्यवहार, नियमन आणि शास्त्रचर्चा' (१९९५) या पुस्तकातील 'संस्कृत आणि प्राकृत : भाषिक व सामाजिक संबंध' या प्रकरणाचा उल्लेख केला आहे.

या प्रकरणात माधव देशपांडे यांनी भाषाशास्त्रीय भूमिका आणि सामाजिक दृष्टिकोन यांतील भेदही अगदी व्यवस्थित स्पष्ट केलेला आहे. तो मुळातूनच उद्धृत करण्याजोगा आहे :

'काही प्रमाणात ... देवाणघेवाणीचा परिणाम म्हणून आणि काही प्रमाणात आर्यभारतीय भाषांमधील अंतर्गत प्रवृत्तींचा परिणाम म्हणून आर्यभारतीय भाषांमध्ये परिवर्तन होत गेले. ऋग्वेदाच्या काळीसुद्धा घरगुती वापरात प्राकृतसदृश भाषा अस्तित्वात होत्या' .... तसेच

आर्यभाषाकुलामध्ये अनेक प्रादेशिक व सामाजिक उपभाषाही प्रचलित होत्या.... 'संस्कृत' आणि 'प्राकृत' या शब्दांमुळे बऱ्याच वेळा ... अशी समजूत होते की भाषांमध्ये असे काही प्रचंड तट पडले होते. वस्तुतः आपल्याला संस्कृत भाषेमध्ये कित्येक ठिकाणी प्राकृतसदृश गुणधर्म दिसतात तर प्राकृत भाषांचेही संस्कृतीकरण झालेले दिसते. प्रत्यक्ष एखाद्या संदर्भातली भाषा ही संस्कृतचे प्राकृतीकरण आणि प्राकृताचे संस्कृतीकरण या दोन्ही प्रक्रियांचे फलरूप म्हणून तयार झालेली असते. परंतु ही झाली भाषाशास्त्रीय भूमिका. भाषा वापरणाऱ्या मंडळींच्या मात्र काही वेळा फार ठाम समजुती असतात आणि त्या समजुतींची ताकद कधी कधी अशी असते की त्यांची दखल घेणे भाग पडते.' (पृ० २५५-५६)

अशी दखल घेणे म्हणजे या ठाम समजुती शास्त्रीय पातळीवर मान्य करणे नव्हे. या ठाम समजुती का उद्भवल्या असाव्या, त्यांना इतकी ताकद का प्राप्त होत असावी, याचा सामाजिक-सांस्कृतिक वेध माधव देशपांडे घेत आहेत. त्यातून एक वेगळ्या प्रकारचा आधुनिक 'शास्त्रीय' विचार आकार घेतो आहे. मराठीसाठी (आणि अर्थात संस्कृतसाठीसुद्धा) विचारांची ही दिशा नवी आहे, अनोखी आहे. ही व्याख्याने जाने-फेब्रु १९९३मध्ये त्यांनी दिली. त्याला २० वर्षे होऊन गेली! पुस्तक १९९५मधे प्रसिद्ध झाले! चपखल उदाहरणे वापरून ओघवत्या शैलीत केलेले हे विवेचन अजूनही दुर्लक्षितच आहे.

भाषेच्या सामाजिक-सांस्कृतिक विश्लेषणाची ही दिशा अजून आपल्या पचनी पडायची आहे, अशी माझी व्यक्तिगत पातळीवरची 'ठाम समजूत' आहे!

**मिलिंद मालशे**

जॉन गंपर्झ यांचे भारतीय पेहरावातील एक छायाचित्र आणि त्यांचा लेखनाची सूची Anthropology Emeritus Lecture Series at U.C. Berkeley : Ninth Emeritus Lecture Honoring John J. Gumperz (Oct 26th 1999) येथे मिळते. जिज्ञासूंनी सूची जरूर पहावी.

**Ninth Emeritus Lecture Honoring John J. Gumperz**
**Lecture, October 26th 1999**
Presenting the Honoree: Dr. Gerald Berreman
Presenting the Speaker: Dr. Laura Nader

Lecture by: Professor Susan Gal, University of Chicago
"Language Ideologies and the Making of Difference"

**Exhibit**

FFieldwork in Germany, India and Norway, 1951-1963

*Crosstalk*, Communication Documentary Series Broadcast on the BBC.

**Biographical Information**

**Published works by John J. Gumperz**

Bibliography of works by John J. Gumperz.

## 'भाषा-मिश्रणा'चे अभ्यासकः जॉन गंपर्झ

जॉन गंपर्झ (९ जानेवारी, १९२२ ते २९ मार्च, २०१३)

सुप्रसिद्ध समाजभाषावैज्ञानिक जॉन गम्पर्झ यांचे गेल्या शुक्रवारी २९ मार्च २०१३ रोजी वयाच्या ९०व्या वर्षी निधन झाले. इंटरनॅशनल प्रॅग्मॅटिक असोसिएशन (IPrA) या संस्थेचे ते पहिले अध्यक्ष होते (१९८६-१९९०).

समाजभाषाविज्ञानामध्ये बहुभाषिक समाजांच्या अभ्यासामध्ये त्यांनी मोलाची भर घातलेली आहे. डेल हाइम्झ (१९२७-२००९) आणि गंपर्झ यांनी Ethnography of Communication या अभ्यासाचा पाया घातला. 'भाषा' ही एक स्थिर निष्पत्ती (product) नसून चल स्वरूपाच्या संदेशनाची, संवादाची प्रक्रिया (process) असते, हे या अभ्यासामागचे मुख्य प्रमेय आहे. भाषिक व्यवस्था या संकल्पनेला केंद्रस्थानी ठेवून होणाऱ्या अभ्यासापेक्षा या अभ्यासाचे स्वरूप वेगळे असते.

बहुभाषिक समाजगटांमधील व्यक्तींमध्ये 'आमने-सामने होणारा संवाद' (face-to-face interaction) कसा चालतो, या अभ्यासामध्ये गंपर्झ यांना विशेष रस होता. 'वाक्य' आणि 'वाक्यरचना' या व्याकरणिक/संरचनात्मक संकल्पनांच्या पलीकडे जाणाऱ्या संकल्पना या अभ्यासासाठी विकसित कराव्या लागतात. बोलींचे मिश्रण (code-mixing) आणि एका बोलीतून दुसऱ्या बोलीत शिरकाव (code-switching) या दोन प्रक्रियांचा अभ्यास येथे करावा लागतो. विशेषतः शहरीकरणाच्या प्रक्रियेमध्ये वेगवेगळे भाषिक समाज आणि व्यक्ती संपर्कात येऊन या प्रक्रिया अपरिहार्यपणे घडू लागतात. दिल्ली या शहरातील हिंदी, पंजाबी आणि इंग्लिश यांच्या संपर्कातून कोणत्या प्रकारचे संदेशन होते याच्या अभ्यासाचा अंतर्भाव त्यांच्या *Language in Social Groups* (1971, Stanford: Stanford uni. Press) या ग्रंथात सापडेल. विविध भाषिक गटांमधील सत्तासंबंधांचा शोध या

अभासातून घेता येता अशी त्यांची धारणा होती.

'भाषिक सापेक्षतावादा'चा पुनर्विचार करणारा त्यांनी संपादिलेला पुढील ग्रंथही महत्त्वाचा आहे:

Gumperz, J.J. and Levinson, S. C. (eds) 1996 *Rethinking Linguistic Relativity*. Cambridge: Cambridge Uni. Press.

**मिलिंद मालशे**

■

## श्रद्धांजली

(१) ज्येष्ठ भाषातज्ज्ञ व कोशकार सत्त्वशीला सामंत यांचे १ मे २०१३ला निधन झाले. त्या ६८ वर्षांच्या होत्या. त्या महाराष्ट्र राज्याच्या भाषा संचालनालयात उपसंचालक म्हणून काही काळ कार्यरत होत्या. 'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली' हे पुस्तक, 'शब्दानंद' हा मराठी, हिंदी, इंग्रजी असा त्रैभाषिक व्यवहारोपयोगी शब्दकोश, तसेच बा०भ० बोरकर यांच्या समग्र कवितांच्या संहिता-संपादनाचे काम यांतून त्यांच्या चिकित्सक भाषाप्रेमाची ओळख पटते.

(२) संत साहित्याचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ० वि०रा० करंदीकर यांचे वयाच्या ९३व्या वर्षी निधन झाले. त्यांचा अभिजात साहित्याचा मोठा व्यासंग होता. 'विचारवेध', 'ग्रंथशोध', 'विचारातील भ्रमंती', 'ज्ञानेश्वरांचा आत्मसंवाद' ही पुस्तके; 'कुणा यात्रिकाचा जीवनसंवाद' हे आत्मचरित्र ही त्यांची महत्त्वाची ग्रंथसंपदा आहे.

(३) दुर्मीळ अभिजात पुस्तके तसेच कोशवाङ्मय प्रकाशित करणाऱ्या 'वरदा प्रकाशन' या संस्थेचे संचालक ह०अ० भावे यांचे वयाच्या ८१व्या वर्षी, १८ जून २०१३ला निधन झाले.

परिषद या सर्वांचा निधनाबद्दल शोक व्यक्त करीत आहे.

# पखालपार्वती

मा० ना० आचार्य

मराठीतील हा एक वैशिष्ट्यपूर्ण जोडशब्द आहे. यातील 'पखाल' या पहिल्या घटकाचा प्रथम विचार करू. यादवकालीन मराठीत याचे 'पाखाल' असे रूप मिळते. कोशगत अर्थ असे - (व्युत्पत्तिसह) -

मोल्सवर्थ - (स्त्री०) पयस्+खल्ल. (पयस् = पाणी, खल्ल = कातड्याची पिशवी.)

A double water - skin carried on a bullock

(fig.) A huge capacious belly

दाते-कर्वे (मराठी शब्दकोश), तुळपुळे-ॲनी फेल्डहाऊस (पाखाल) (Old Marathi Dictionary)

अशीच व्युत्पत्ती व असेच अर्थ देतात. (मात्र तुळपुळे-ॲनी यांच्या शब्दकोशात पयस् + खल्ल ही व्युत्पत्ती प्रश्नचिन्हांकित ठेवलेली आहे.)

मराठी-हिंदी-शब्दकोश - (गो०प० नेने व श्रीपाद जोशी)

यामध्येही - पखाल, मोट या अर्थांच्या बरोबरीने, तोंद (मराठी दोंद), फूला हुआपेट असे अर्थ मिळतात.

- या पखालीवरून आलेला वाक्प्रचार -

पखाल सोडणे = मूत्रविसर्जन करणे (बायकी निंदाव्यंजक शब्द)

(दाते-कर्वे - 'वाक्-संप्रदाय कोश')

अ०द० मराठे - 'मराठी भाषेतील असभ्य म्हणी आणि वाक्प्रचार संकेत)

- आता जोडशब्द - (पखालपार्वती) याचा उल्लेख उपरोक्त, सर्व कोशांत आहे. (अपवाद - तुळपुळे-ॲनी)

अर्थ - (मोल्सवर्थ) - a flabby, bloated and dulky woman.

- (दाते-कर्वे) - ढेरपोटी स्त्री.

- (नेने-जोशी) - बडी तोंदवाली मोटी-ताजी स्त्री.

आता या जोडशब्दाच्या स्पष्टीकरणार्थ प्रथम यादव मराठीतील 'पाखाल' पाहू. हा शब्द 'लीळाचरित्र' (पू०२७, उ० ३४४)

- 'गोविंदप्रभुचरित्र' (७ व ५७)

नरेंद्रकृत - 'रुक्मिणीस्वयंवर' (४२९) येथे मिळतो.

आपल्या चर्चेसाठी यातील गोविंद प्रभूंची (७) ही लीळा महत्त्वाची. ती सारांशरूपाने अशी - एकदा एका बाईला नदीवरून घडाभर पाणी आणावयाचे होते. जवळ होते लहान मूल. त्याला कुठे ठेवावे? घरात दुसरे कुणी नव्हते. एवढ्यात तेथे गोविंदप्रभू (गोविंद राउळ) आले. त्यांना त्या बाईने मुलाकडे लक्ष देण्यास सांगितले. राउळांनी मुलाला घेतले. थोडा वेळ खेळविले. नंतर बाजूच्या खुंटीवर **पाखाल** होती, ती खाली अंथरली. पाखालीची एक बाजू (पाख) अंथरून दुसऱ्या पाखेचे पांघरूण घातले. मूल शांत झोपले. राउळ निघून गेले. बाई पाणी घेऊन आली. मूल दिसेना म्हणून घाबरली. शेजारणीला विचारले, ती म्हणाली, 'तू तरी अशी कशी वेंधळी. राउळ वेडेपिसे. त्यांच्यावर काय विसंबून राहिलीस?' इतक्यात पाखाल हलताना दिसली. एक पाख दूर करून पाहिले. मूल शांत झोपले होते.

आता या लीळेवरील टिपेत संपादक व०दि० कुलकर्णी यांनी 'पाखाल'ची व्युत्पत्तीही सुचविली आहे - 'दोन पाखे असतात म्हणून पाखाल.'

'पयस् + खल्ल'पेक्षा ही व्युत्पत्ती अधिक योग्य वाटते. (पक्ष-पख-पाख) पखाल बैलाच्या पाठीवर टाकून पाणी आणतात. तेव्हा तिला पडशीसारख्या दोन बाजूला पिशव्या असणारच. (या संदर्भात 'दुपाखी घर' आठवावे.)

आता नरेंद्राच्या 'रुक्मिणी स्वयंवर'मधील संदर्भ पाहू.

ती ओवी अशी -

तेथ भूमिका पायीं दडपे । तेणें गर्भिची पाखाल चिरपे।

तें उदक वरौतें निगे चेपें । भरे पोकळे रूपी ॥ (४२९)

हे वर्णन धारादामोदर नामक शीतगृहाचे आहे. विरहज्वरामुळे संतप्त झालेल्या रुक्मिणीला तिची सखी शीतल उपचारांसाठी या शीतगृहात नेते. या शीतगृहात पाण्याचे पाट होते. तेथे पाणी येई ते जमीन दबली की तिच्या गर्भातील पाखालीचे पाणी वर झिरपत येई.

या वर्णनात भूमातेच्या गर्भाची पाखाल (गर्भपिशवी) आहे.

अशी ही पखाल-पाखाल. आता जोडशब्दाचा दुसरा घटक - पार्वती. पार्वती हे विशेषनाम. पण येथे 'स्त्री' या अर्थाने योजलेले सामान्यनाम. असाच प्रकार 'लक्ष्मी' या शब्दाबाबत झालेला आहे. लग्न होऊन घरात येणारी स्त्री ही घरची लक्ष्मी असते. काही दिवसांनी पतीशी संलग्न होऊन ती अर्धनारीनटेश्वराची पार्वती होते. हळूहळू प्रौढ होते. पोट सुटते. मग पखालपार्वती होते. एखादी दुर्दैवी स्त्री पतीच्या उधळपट्टीमुळे अलंकारहीन होते. अंगावरच्या शालू पैठण्या जातात व फाटक्या वस्त्रांनी जणू उघडीच पडते. मग ती होते 'लंकेची पार्वती.' ही लंका म्हणजे रावणाची लंका नव्हे. लंका म्हणजे नग्न स्त्री. पार्वतीचे एक रूप लज्जागौरीचे म्हणजे नग्नरूप आहे. तशी होणारी ही सामान्य

स्त्री - लंकेची पार्वती. (पहा - रा०चिं० ढेरे - लज्जागौरी - पृ० २७ ते २९)

- आता 'पखाल सोडणे' या वाक्प्रयोगाचा विचार करू. अर्थ वर नोंदलाच आहे. गर्भपिशवीप्रमाणे मूत्राशय हीदेखील पखालच. या संदर्भात एक ऐकीव गमतीदार गोष्ट सांगतो.

पूर्वी विवाहसोहळे चांगले चार-चार दिवस चालत. मुलाकडची मंडळी मुलीकडल्यांना जेवढा म्हणून त्रास देता येईल तो देऊन टेंभा मिरवीत वरात घेऊन जात. अशा त्या जुन्या काळची ही गोष्ट आहे.

एकदा एका लग्नात लग्नादिवशीची पहिली पुरुषांची पंगत ऐसपैस जेवून उठल्यानंतर विहिणी जेवायला बसल्या. विहीणबाई चांगल्या पखालपार्वतीच होत्या. फतकल मारून बसल्या. नाकातली नथ काढून गळ्यातल्या सरीला अडकवली. का? जेवताना ओठांवर येऊ नये म्हणून. आणि नाक मोकळे झाले की प्रत्येक पदार्थाला नावे ठेवून ते मुरडताही येते. पंगत बराच वेळ चालू होती. कुणी उठण्याचे नावच नव्हते. मुलीकडच्या स्त्रिया ताटकळत होत्या. मग घरातल्या आजीबाईंनी केली एक युक्ती. केळीच्या पानांतील देठ (टाटोळा) घेतला व त्याचा रस काढून कढीत टाकला. विहीणबाईंना ती कढी आग्रहाने वाढली. थोड्याच वेळात त्यांची चुळबूळ सुरू झाली. आजी मुलीच्या आईला हळूच म्हणाल्या, 'बघ आता ती म्हैस चटकन् उठेल. कारण पखाल सोडलीन नाही, तर शालू ओला होईल.'

यावर भाष्याची गरज नसावी. ■

**मराठी मखरातील नि मनातील!**

भले आपण केंद्र सरकारला आपल्या मायमराठीचे श्रेष्ठत्व पटवून देऊ, अभिजात दर्जा मिळवू आणि तिच्या सर्वांगीण विकासासाठी भक्कम आर्थिक साह्यही मिळवू; पण हे श्रेष्ठत्व आपल्या मनात मुरले आहे का? मराठी भाषेला मखरात बसवायला आपण उत्सुक आहोत; पण आपल्या दैनंदिन जीवनाचा अविभाज्य भाग म्हणून आपण मराठीला कितपत स्थान देतो? प्रत्येकाने हा प्रश्न स्वत:ला विचारून पाहिला तर त्याचे उत्तर धक्कादायक येईल. नवनवी आव्हाने एकीकडे सर्वच भाषा - संस्कृतीपुढे उभी ठाकत आहेत. जागतिकीकरणातून येणारे एक प्रकारचे सपाटीकरण हे असेच एक आव्हान आहे. त्याच्या रेट्याखाली आपली वैशिष्ट्ये चिरडली जाऊ नयेत, यासाठी सर्जक आणि सामूहिक प्रयत्नांची गरज आहे; पण तसा उत्साह कुठे दिसत नाही. हे खेदकारक आणि उद्वेगजनक आहे.

संपादकीय, 'सकाळ' २५ मे २०१३

पुस्तक परीक्षण

# मराठीचे आधुनिकीकरण

सुमन बेलवलकर

[परीक्षित ग्रंथ : 'मराठीचं आधुनिकीकरण (मराठी वृत्तपत्रांचे योगदान)' डॉ० विलास चिंतामण देशपांडे, प्रकाशक - विसा बुक्स, नागपूर, २०१२, पृष्ठसंख्या २५४, किंमत ₹ २७५/-]

भाषाविज्ञानांतर्गत मराठीच्या कालिक भेदांचे संशोधन ही शाखा फारशी समृद्ध आहे असे म्हणता येणार नाही. अशा स्थितीत डॉ० विलास चिंतामण देशपांडे यांनी आचार्य पदवीसाठी 'मराठी वृत्तपत्रांचे मराठी भाषेच्या आधुनिकीकरणास योगदान' हा प्रबंध सादर करून ही उणीव भरून काढली आहे. सदर पुस्तक हे या प्रबंधाचे ग्रंथसार आहे. प्रबंधाला आवश्यक अशी सूक्ष्म आणि सर्वंकष निरीक्षणे व त्यावर आधारित प्रतिपादन ही शिस्त काटेकोर रीतीने पाळून हा प्रबंध सिद्ध केला आहे, हे जागोजागी जाणवते.

या ग्रंथात एकूण अठरा प्रकरणे आणि दोन परिशिष्टे आहेत. पहिल्या प्रकरणात डॉ० देशपांडे यांनी मराठी वृत्तपत्रांच्या मूलस्रोतांविषयी माहिती दिली आहे. 'नारदमुनी हे जगातले पहिले पत्रकार किंवा बातमीदार होत' हे त्यांचे विधान रंजक वाटले तरी प्रबंधात त्याला स्थान देणे योग्य नाही. ६ जानेवारी १८३२ रोजी 'दर्पण' हे पहिले वृत्तपत्र निघाले. त्याला मुद्रणकलेच्या इतिहासाची परंपरा आहे. मुद्रणकलेचे व वृत्तपत्राचे उगमस्थान चीन हे राष्ट्र आहे. पण खरी प्रगती युरोपात झाली. मुद्रणकलेचा उदय युरोपात पंधराव्या शतकात झाला. भारतात तो सोळाव्या शतकात झाला तरी खरी प्रगती अठराव्या शतकात झाली. या ठिकाणी डॉ० देशपांडे यांनी मुद्रणाचा वृत्तपत्रछपाईपर्यंतचा इतिहास, भारतीय भाषांमधील वृत्तपत्रांचा आरंभ यांची माहिती देऊन देशी भाषांमध्ये राजा राममोहन राय यांनी ४ डिसेंबर १८२१ रोजी 'संवाद कौमुदी' हे पहिले वृत्तपत्र काढले असे म्हटले आहे. मराठी वृत्तपत्रांच्या दृष्टीने वृत्तपत्रांच्या मूलस्रोतांविषयी दिलेले सर्व तपशील अभ्यासपूर्ण आहेत.

एकोणिसावे शतक हा काळ समाजसुधारणांचा आणि राजकीय जागृतीचा होता. या काळात 'दर्पण', 'मुंबई अखबार', 'प्रभाकर', 'धूमकेतु', 'ज्ञानसिंधु', ख्रिस्ती धर्मप्रसार करणारे 'ज्ञानोदय', 'ज्ञानप्रकाश', 'इंदुप्रकाश', 'हिंदुपंच', दलितांविषयीचे 'दीनबंधु' अशी वृत्तपत्रे निघाली. लोकहितवादींची शतपत्रे 'प्रभाकर'मध्ये आली.

'ज्ञानप्रकाश' हे १९०४ पासून निघालेले पहिले दैनिक ठरले. 'हिंदुपंच'ने व्यंग्यचित्रांची पद्धत सुरू केली. ४ जानेवारी १८८१ रोजी निघालेल्या 'केसरी'ने स्वाभिमानाच्या युगाचा प्रारंभ केला. 'पत्रकर्त्यांची गस्त' ही केसरीची भूमिका होती.

१९व्या शतकाच्या शेवटी आणि विसाव्या शतकाच्या आरंभी राष्ट्रीय पत्रकारितेला वाहिलेली काही भाषांमधली ६२ पत्रे निघाली. हा 'लोकमान्य', 'नवा काळ' यांच्या उदयाचा काळ होता. क्रिकेटची मराठी परिभाषा 'नवा काळ'ने रुजवली. 'तरुण भारत' १९२६ आणि 'सकाळ' १९३१ ही ब्राह्मणी वर्गाची प्रातिनिधिक पत्रे स्वातंत्र्यपूर्व काळात निघाली. स्वातंत्र्यानंतर वृत्तपत्राकडे व्यवसाय या दृष्टीने भांडवलदारांचे लक्ष गेले. त्यांनी १४ जानेवारी १९४८ला 'लोकसत्ता' सुरू केले. महाद्विभाजकाच्या संकट निवारणार्थ अत्र्यांनी 'मराठा' काढले. तर यशवंतराव चव्हाणांनी टाइम्स ग्रुपला मराठी पत्रकारितेत ओढून १८ जून १९६२ रोजी 'महाराष्ट्र टाइम्स' काढायला लावले. हा अलीकडच्या काळातील वृत्तपत्रांचा इतिहास आहे.

आधुनिकीकरण ही संकल्पना स्पष्ट करताना डॉ० देशपांडे म्हणतात, 'विविध पातळीवर ज्ञानसाधना करणे, व्यवहारात वैज्ञानिक दृष्टिकोन स्वीकारणे, विचारात तर्कसंगत बैठक असणे, मानवी संबंधात समता व स्वातंत्र्य ही मूल्ये स्वीकारणे, आचारविचारात परिवर्तनशीलता असणे ही आधुनिकीकरणाची प्रमुख लक्षणे मानता येतील.'(पृ० ३७) मुळाबरहुकुम या व्याख्येत वेगवेगळे मुद्दे आहेत. पण आधुनिकीकरणाचा पाया असलेले बुद्धिवाद, वस्तुनिष्ठता आणि पुरोगामित्व हे आवश्यक शब्दप्रयोग आलेले नाहीत. भाषिक आधुनिकतेत प्रामुख्याने राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक परिस्थितीचे समकालीनत्व, अद्ययावत स्वरूप अनुस्यूत असते. हा समकालीनत्वाचा मुद्दाही इथल्या विवेचनात आलेला नाही.

वृत्तपत्रीय भाषेचे स्वरूप व वैशिष्ट्ये पाहू गेल्यास तिच्यात विविधता असली तरी ती वाचकाभिमुख आढळते. अग्रलेखांची भाषा, बातम्यांची भाषा, जाहिरातींची भाषा, मथळ्यांची भाषा वापरण्यामागे असणारी प्रयोजने व शैली वैशिष्ट्यपूर्ण असल्याने डॉ० देशपांडे वृत्तपत्राच्या भाषेला प्रयोजनमूलक भाषा (register) म्हणतात.

मराठी भाषेच्या उगमापासून तिच्यावर अन्य भाषांचा प्रभाव आढळतो. यादवकालीन मराठीवर जुन्या कन्नड भाषेचा हळेगन्नड शब्दांचा प्रभाव होता. इस्लामी आक्रमणानंतरच्या तीन-साडेतीनशे वर्षांत तिच्यावर पर्शोअरेबिक भाषांचे वर्चस्व होते. दीडशे वर्षांच्या ब्रिटिशांच्या राजवटीत इंग्रजीचा रेटा तिच्यावर पडला. स्वातंत्र्योत्तर काळात राष्ट्रभाषा हिंदीची सरमिसळ मराठीत होऊ लागली. या सर्व भाषांचा परिणाम वृत्तपत्रांच्या मराठीवर होणे स्वाभाविक होते. वर्तमानपत्राचे कामकाजच मुळी दूरमुद्रकावर (टेलिप्रिंटर) सतत चालते. डॉ० देशपांडे यांनी या अन्यभाषा प्रभावाचा सविस्तर विचार केला आहे. देवनागरी

लिपीत लिहिलेले इंग्रजी शब्द, हिंदी शब्द-वाक्‌प्रचार, संस्कृतनिष्ठ शब्द, इंग्रजीसाठी नवनिर्मित पर्यायी संस्कृत शब्द यांची अनेक उदाहरणे त्यांनी दिली आहेत.

काही नवीन साधित, सामासिक व अभ्यस्त शब्दांची चर्चा डॉ० देशपांडे यांनी स्वतंत्र प्रकरणात केली आहे. यात 'चाललीय्, येतय्' या क्रियापदरूपांना ते 'आधुनिक फॅशन' म्हणतात. वास्तविक ती चालली आहे, येत आहे या रूपांची बोली भाषेतली संक्षिप्त रूपे आहेत. पुढे पृ० १०२ वर ही सुधारणा त्यांनी केली आहे. सामासिक शब्दांमध्ये 'राज्यव्याप्त'ची फोड 'राज्यात व्याप्त' अशी देऊन शीर्षक मात्र 'तृतीया तत्पुरुष' असे दिले आहे. 'स्वतंत्र कक्ष, मूळ वेतन, खुली विक्री' हे सामासिक शब्द नाहीत. ते संयुक्तरीत्या लिहिले जात नाहीत. तुलनेने वृत्तपत्रांत प्रामुख्याने आढळणाऱ्या ऱ्हस्वदीर्घांची उदाहरणे मात्र त्यांनी कमी दिली आहेत.

मराठीचे आधुनिकीकरण केवळ शब्दसंग्रह, वाक्यरचना, उच्चार यांच्यामध्ये झाले असे नाही. त्यात लेखनविषयक, मुद्रणविषयक परिवर्तने झाली. त्याचीही नोंद ग्रंथकाराने घेतली आहे. लेखनाची भाषा बोली भाषेहून वेगळी असली पाहिजे याची सर्वप्रथम जाणीव दादोबांना झाली. मुद्रणाच्या सोयीसाठी झालेली ब्यांक-बँक, श्रुत्ध-शुद्ध, बेश्रम-बेशरम, श्रुक्रवारी-शुक्रवारी अशी काही परिवर्तने त्यांनी दिली आहेत. अमेरिकन राष्ट्राध्यक्षांचे नाव रिगन-रेगान-रेगन अशा बदलातून गेले. या ठिकाणी 'ष या वर्णाचा उच्चार जर बोलण्यातून नाहीसा झाला असेल तर ते अक्षर लेखनातून काढून टाकणेच योग्य ठरेल' हे काहीसे वादाला आमंत्रण देणारे विधान त्यांनी केले आहे.

वृत्तपत्राच्या आशयासंबंधी केलेल्या चर्चेत मथळे, बातमीपत्रे, जाहिराती, अग्रलेख, वाचकांचा पत्रव्यवहार यांचा प्रकरणशः विचारविमर्श हा या ग्रंथाचा महत्त्वाचा भाग आहे. मथळ्यांचे महत्त्व आणि स्वरूप कसे असते ते डॉ० देशपांडे यांनी उदाहरणांसह चर्चिले आहे. बातमीपत्राची मांडणी मथळा, स्थान, तारीख, वृत्तसंस्था देऊन 'कधी कसे काय कुठे केव्हा कोण' याची उत्तरे पहिल्या भागात आणि तपशील पुढच्या भागात अशी असते. बातमीपत्राच्या भाषेत दर्पण-केसरी युगापासून आजच्या वृवपत्रांपर्यंत बरेच काही परिवर्तन झालेले आढळते.

वृत्तपत्राचे अर्थकारण जाहिराती ठरवतात. वृत्तपत्राच्या खपावर त्यातील जाहिरातींचे मूल्य व संख्या अवलंबून असते. वृत्तपत्राची ४०% जागा जाहिरातींनी व्यापलेली असते. वर्गीकृत व अवर्गीकृत असे त्यांचे स्वरूप असते. चित्रे, मथळा, उपमथळा, घोषणा, बोधचिन्ह हे जाहिरातीचे घटक असतात. अशी जाहिरातीच्या मांडणीची माहिती देऊन डॉ० देशपांडे यांनी जाहिरातींच्या भाषेचे विश्लेषण केले आहे. इंग्रजी धाटणीच्या जाहिरातीत त्यांनी 'केप्र' हा शब्द दिला आहे. (१२९) वास्तविक हा इंग्रजी शब्द नसून केशवलक्ष्मी प्रसाधनचा संक्षेप आहे. इलेक्ट्रॉनिक मीडियावर होणाऱ्या जाहिरातींचा

वृत्तपत्रातील जाहिरातींवर होणारा परिणाम या मुद्याची चर्चा इथे केली असती तर बरे झाले असते.

कोणत्याही वृत्तपत्राच्या शीर्षस्थानी अग्रलेख असतो. वृत्तपत्राच्या उगमापासून आजपर्यंत अग्रलेखाचे महत्त्व अबाधित राहिले आहे. अग्रलेखाचे वाचक मर्यादित असले तरी जागरूक व जाणकार असतात. वृत्तपत्राचे धोरण अग्रलेखावरून ठरते. डॉ० देशपांडे यांनी बाळशास्त्री जांभेकर, भाऊ महाजन, विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर, टिळक, काकासाहेब खाडिलकर, न०चिं०केळकर, शि०म० परांजपे, अच्युतराव कोल्हटकर, महाराष्ट्रकार ओगले, भालाकार भोपटकर, ग०त्र्यं० माडखोलकर, आंबेडकर आणि अत्रे यांच्या अग्रलेखांची वैशिष्ट्ये सांगून त्यांची उदाहरणे सादर केली आहेत.

मराठी वृत्तपत्रांना परभाषेतील संकल्पना आत्मसात कराव्या लागतात. या संकल्पना निरनिराळ्या क्षेत्रातील असतात. त्यासाठी अनुवादाची गरज पडते. डॉ० देशपांडे यांनी 'वृत्तपत्रातील अनुवादाचे स्वरूप' हे स्वतंत्र प्रकरणच त्यासाठी लिहिले आहे. प्रत्येक प्रकाराची उदाहरणे त्यांनी सादर केली आहेत. यातील काही अनुवाद फारसे समाधानकारक वाटत नाहीत. अधिसूचित Advertised, बेमुदत Untimed , हातमिळवणी होणे Compromise, विद्युत्चलन Electric Current, राष्ट्रकुल Joint State, शल्यचिकित्सक Civil Surgeon, शिखरतुल्य Top Ranking, (१६४ ते १६९) या ठिकाणी अनुवादित शब्दातून निराळाच अर्थ सूचित होतो. अनुवादाबाबत, अनुवादकाला दोन्ही भाषांचे चांगले ज्ञान हवे, वाक्याचा अनुवाद नको, आशयाचा अनुवाद, सांस्कृतिक संकल्पना अनुवादात स्पष्ट व्हाव्यात, वाचकाभिमुख अनुवादशैलीचा वापर करावा हे डॉ० देशपांडे यांचे मुद्दे स्वीकारार्ह आहेत.

वृत्तपत्रांच्या संदर्भात गाजलेला मुद्दा म्हणजे भाषाशुद्धीची संकल्पना. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी इंग्रजीच्या कचाट्यात सापडलेल्या मराठीविषयी चिंता व्यक्त केली. सावरकरांनी हिंदू भाषासंघ आणि अहिंदू भाषासंघ अशी विभागणी केली. माधवराव पटवर्धनांनी बोली भाषेतील शब्दांच्या वापरावर भर दिला होता. इंग्रजी, हिंदी, संस्कृत शब्दांना मराठी पर्याय असतानाही ते वापरले जात नाहीत याची उदाहरणेच डॉ० देशपांडे यांनी दिली आहेत. यातील काही उदाहरणांबाबत मात्र समाधान होत नाही. हॉटेलसाठी भोजनालय, (निवास - फराळाच्या पदार्थांचे काय?) मास्टर प्लॅन - भव्य योजना, मेजवानी-पाहुणचार, देहान्त-मरेस्तोवर पर्यंत, अतिसांसर्गिक - लागट अशा काही शब्दांच्या अर्थाच्या छटा चपखल वाटत नाहीत. फॅशनसाठी ढंग, प्रचार, खूळ, प्रथा, रूढी, टूम इतके पर्याय देऊनही नेमका शब्द सापडत नाही. माधवराव पटवर्धनांनी सुचवलेला जखमींसाठी घायाळ हा शब्दही हिंदी आहे. त्यामुळे भाषाशुद्धीचा आग्रह निरर्थक आहे, असे सांगून डॉ० देशपांडे यांनी बहुजन समाजाला आकलन होईल ती

शुद्ध भाषा असे मत मांडले आहे. (१८६)

भाषिक आधुनिकीकरणाच्या प्रधान प्रक्रियांमध्ये अर्थसंकोच, अर्थविस्तार, अर्थबदल असे अर्थपरिवर्तनाचे स्वरूप दिसते तर आदानाद्वारेही शब्दसंग्रहात भर पडते. यातल्या उदाहरणांमध्ये 'विदूषक - मूर्ख' हा अर्थसंकोच नसून अर्थविस्तार आहे. Warm welcome चे 'गरम स्वागत' हे रूपांतर कृत्रिम आहे. अगत्यशील हा शब्द तिथे उपयुक्त ठरतो. Hunger strike हे उपोषण आमरणच असते असे नाही. राजभाषेचा दर्जा दिल्यापासून जिथे जिथे शक्य असेल तिथे इंग्रजी नको या हट्टापायी मराठीचे मराठीपण हरवून बसण्याची भीती निर्माण झाली आहे. इंग्रजी शब्दांना मराठीतून हद्दपार करण्याच्या हव्यासापोटी मराठी वृत्तपत्रांनी हिंदी शब्दांना आपलेसे केले आहे, असे निरीक्षण नोंदवून मराठी वृत्तपत्रांनी मराठी भाषेच्या आधुनिकीकरणास सहकार्यच केले आहे; असा सिद्धांत डॉ० देशपांडे यांनी शेवटी मांडला आहे.

डॉ० देशपांडे यांचा संशोधनविषय विस्तृत कक्षेचा आहे. १८३२च्या 'दर्पण'पासून विसाव्या शतकाच्या अखेरच्या प्रमुख वृत्तपत्रांचा धांडोळा घेऊन निरीक्षणे नोंदवणे, छाननी करणे, विश्लेषण करून विवेचनाचे मुद्दे मांडणे हे मोठेच जिकिरीचे काम होते. या वृत्तपत्रांमधून आढळलेल्या बत्तीस पृष्ठांच्या वैशिष्ट्यपूर्ण शब्दांच्या सूचीवरून डॉ० देशपांडे यांच्या संशोधनातील बारकावा लक्षात येतो. भरपूर उदाहरणांनी सजलेले यातील तत्त्वविवेचन अभ्यासकाची विषयावरील पकड दाखवते. डॉ० देशपांडे यांच्या या ग्रंथाने सदर विषयावरील संदर्भग्रंथांत मोलाची भर पडली आहे. हे पुस्तक पत्रकारांना मार्गदर्शक आणि सामान्य वाचकांना सारखेच उद्बोधक आहे. ■

### ई वाचाल तर वाचाल!

'वाचाल तर वाचाल' हे झाले विसावे शतक, 'ई वाचाल तर वाचाल' हे आता एकविसावे शतक! वाचनप्रेम टिकवण्याचा उपायही नवतंत्रज्ञानाने आपणांस दिलेला आहे. इलेक्ट्रॉनिक म्हणजेच 'इ-बुक रीडर' ऊर्फ यंत्राच्या साहाय्याने पुस्तके वाचणे. अशा इ-बुक रीडर्समध्ये सर्वात लोकप्रिय म्हणजे 'किंडल', हे इंटरनेटच्या माध्यमातून पुस्तके विकणाऱ्या 'ॲमेझॉन डॉट कॉम'च्या बलाढ्य कंपनीचे अपत्य आहे. एखाद्या जाडसर वहीच्या आकाराचे हे साधन आपण खरेदी केल्यास त्यामध्ये साठवलेली पुस्तके आपण कोठेही बसून स्क्रीनवर वाचू शकतो. हे साधन आपणांस पुस्तक चक्क ऐकवते देखील... कथाकथनाची कॅसेट ऐकल्याप्रमाणे. ह्याला संगणक अथवा इतर कशाचीही प्रत्यक्ष जोडणी लागत नाही; कारण ह्याचे काम बिनतारी रेडिओतंत्राने संपूर्ण जगभर चालते.

डॉ० दीपक शिकारपूर, 'लोकमत (मंथन)', २ जून २०१३



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र ज्ञानकोश

सुशान्त शंकर देवळेकर

[साधारण इ०स० २००० नंतर संगणकावरील मराठीचा वापर सुकर झाला. युनिकोड या संकेतप्रणालीमुळे ही सोय उपलब्ध झाली. विविध लिप्यांमध्ये असलेल्या माहितीची संगणकावरील साठवण आणि देवाणघेवाण अचूकपणे करण्यासाठी ही संगणकप्रणाली अस्तित्वात आली. भारतीय भाषांसाठी केंद्र शासनाने तयार केलेल्या इस्की या संगणकप्रणालीचा आधार घेत युनिकोडात भारतीय लिप्यांचा समावेश झाला आणि संगणकावरील त्यांचा वापर केवळ मुद्रणापर्यंत मर्यादित होता तो संगणकप्रक्रियांपर्यंत जाऊन पोहोचला.

युनिकोडामुळे मराठीचा महाजालावरील वावर वाढला आहे. विविध संकेतस्थळे सहजपणे मराठीतून लोकांशी संवाद साधू लागली आहेत. आता आवश्यकता आहे ती मराठीतील विविध प्रकारचे पाठ्य महाजालावर उपलब्ध होण्याची. ह्या दृष्टीने विविध अंगांनी प्रयत्न होत आहेत. महाजालावर विविध विषयांची माहिती देणारी जी महत्त्वपूर्ण संकेतस्थळे झाली आहेत. त्यापैकी काही संकेतस्थळासंबंधीची माहिती या सदरांद्वारे देण्यात येत आहे.

-संपादक ]

महाराष्ट्रीय ज्ञानकोश हा मराठी भाषेच्या इतिहासातील एक महत्त्वाचा बहुखंडी ग्रंथराज आहे. डॉ० श्रीधर व्यंकटेश केतकर आणि त्यांचे सहकारी यांनी मिळून हा ज्ञानयज्ञ नेटाने सिद्धीस नेला. प्रस्तावनेचे पाच खंड आणि कोशनोंदीचे १६ खंड (शरीरखंड) तसेच सूचीचा खंड आणि पुरवणी खंड हे दोन खंड अशा एकूण २३ खंडाचा हा ग्रंथ एकूण १२ वर्षे खपून निर्माण करणारे आणि तो विकून दाखवणे हे कार्य डॉ० केतकर आणि त्यांचे सहकारी यांनी निष्ठेने केले. (१) हिंदुस्थान आणि जग, (२) वेदविद्या, (३) बुद्धपूर्व जग, (४) बुद्धोत्तर जग, (५) विज्ञानेतिहास असे पाच विषयांना वाहिलेले प्रस्तावनेचे खंड आहेत. हे प्रस्तावना खंड म्हणजे त्या त्या विषयावरील स्वतंत्र ग्रंथच

आहे. कोशाच्या शरीरखंडातील नोंदी ह्या त्या महाराष्ट्रीयांसाठी आहेत याचे भान ठेवून लिहिलेल्या आहेत. या ग्रंथाच्या निर्मितीची सुरस कथा 'माझे बारा वर्षांचे काम' ह्या पुस्तकात स्वतः ज्ञानकोशकारांनीच सांगितली आहेत. ती मुळातूनच वाचण्यासारखी आहे. हे पुस्तक पीडीफ स्वरूपात पुढील दुव्यावर उपलब्ध आहे. (http://oudl.osmania.ac.in/handle/OUDL/244) महाराष्ट्रीय ज्ञानकोशावरील केतकरांच्या विचारांचा प्रभाव, ज्ञानकोशाच्या मर्यादा ह्यांवर समकालीन आणि नंतरच्या विद्वानांनी सविस्तर लिहिलेले आहे. मात्र आजच्या दृष्टीने पाहता हा महाराष्ट्राचा आणि मराठी भाषेचा ऐतिहासिक ठेवा आहे आणि तो आपल्याला नाकारता येणार नाही.

हा ठेवा महाजालावर नुकताच उपलब्ध झाला आहे. (http://ketkardnyankosh.com) ह्या संकेतस्थळावर संपूर्ण 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' उपलब्ध करून देण्यात आले आहे. यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई यांच्या वतीने हे संकेतस्थळ रचण्यात आले असून त्याची तांत्रिक निर्मिती पूजासॉफ्ट (श्री० माधव शिरवळकर) यांनी केली आहे.

ह्या संकेतस्थळावर महाराष्ट्रीय ज्ञानकोशाची संपूर्ण सामग्री उपलब्ध आहे. अनेकदा जुने नवे ग्रंथ संकेतस्थळावर उपलब्ध करून देताना बदललेल्या माध्यमांचे भान बाळगले जात नाही. पण इथे तसे झालेले नाही. ज्ञानकोशाची ही संगणकीय आवृत्ती सिद्ध करताना हे माध्यमाचे भान बऱ्यापैकी बाळगले आहे हे जाणवल्यावाचून राहत नाही.

ज्ञानकोशाचे संपूर्ण पाठ्य युनिकोड संकेतप्रणालीत टंकलिखित केलेले असल्याने विविध तऱ्हेने शोध घेणे शक्य झाले आहे. या संकेतस्थळाची दोन वैशिष्ट्ये आहेत. ते महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे समग्र पाठ्य काही संगणकीय सोयी जोडून वाचकांना उपलब्ध करून देते तसेच मूळ ज्ञानकोशाची रचना जशी आहे तशा तऱ्हेने ही सामग्री संगणकावर मांडते. 'डॉ० केतकरांच्या ज्ञानकोशाची रचना' हे या संकेतस्थळावरील टिपण ही मांडणी स्पष्ट करून सांगते.

ज्ञानकोशाची लेखनपद्धती जुन्या पद्धतीची आहे. तिला अनुसरून मजकूर टंकलेला आहे. शरीरखंडातील नोंदी अकालविल्हे शोधण्यासाठी संकेतस्थळावर अ ते ज्ञ असे अक्षरांचे दुवे दिलेले आहेत. तसेच आपल्याला हवा असलेला शब्द टंकून शोधण्यासाठी शोधचौकट आहेच. ज्ञानकोशातील टिपांच्या जागा इथे मजकुरावर चांदणी देऊन दाखवल्या आहेत. चांदणीवर बाणाचे टोक नेले असता वेगळ्या उपचौकटीत संबंधित टीप दिसायची सोय आहे!

कोशाच्या रचनेचा विचार संकेतस्थळ रचणाऱ्यांनी बऱ्यापैकी केला असला तरी काही मुद्रणदोष आणि लेखनदोष खटकतात. विशेषत्वाने सांगायचे तर ऱ्यऐवजी -य टंकणे, दृष्टिकोनऐवजी दृष्टीकोन लिहिणे, संकतस्थळाच्या मुख्य पानावर 'मुख्य पान' असेच

लिहिले तरी वाक्यात 'होम पेज' ही संज्ञा वापरणे (संकेतस्थळाच्या होम पेजवर डावीकडे सर्वात वर संदर्भशोधाची व्यवस्था केलेली आहे.) इ०

संकेतस्थळ रचणाऱ्यांना एक सूचना करीवीशी वाटते. ज्ञानकोशाच्या मूळ खंडांतील पृष्ठांचे क्रमांक त्या पृष्ठावरील मजकूर संकेतस्थळावर जिथे सुरू होतो तिथे द्यावेत आणि त्यांचे दुवे एका पानावर उपलब्ध करून हे खंड पृष्ठावर शोधायचीही सोय करून द्यावी. त्यामुळे ज्ञानकोशाची समीक्षा करताना समकालीनांनी दिलेले मूळ पुस्तकांतील संदर्भ पाहणे सोयीचे होईल. तसेच आजवर ज्ञानकोशावर झालेल्या टीकांची सामग्रीही एकत्र करून त्यापैकी जी सामग्री संकेतस्थळावर घालणे शक्य आहे ती घालावी आणि उर्वरित सामग्रीचे पत्ते द्यावे.

डॉ० केतकरांचा ज्ञानकोश महाजालावर उपलब्ध करून देऊन ज्ञानपिपासू मराठी जनतेला यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठानने ही मोठीच भेट दिली आहे. ज्ञानकोशकारांचे इतके उचित स्मारक दुसरे करता येणार नाही असे आपण शकू. प्रतिष्ठानचे आभार मानायलाच हवेत!

■

**साताऱ्याच्या सांस्कृतिक चळवळीचे केंद्र**

मुंबईचे 'एशियाटिक सोसायटीचे ग्रंथालय' हे महाराष्ट्रातील मुद्रित ग्रंथांचे सर्वात जुने आणि पहिले (१८०५) ग्रंथालय होय. याचबरोबर धोबीतलाव येथील 'पीपल्स फ्री रीडिंग रूम ॲण्ड लायब्ररी' व फोर्टमधील 'जे०एम० पेटिट ग्रंथालय' आणि 'डेव्हिड ससून लायब्ररी' हीदेखील अशीच जुनी ग्रंथालये आहेत.

बहुतेक सर्व ग्रंथालयांच्या उभारणीमध्ये ब्रिटिशांचा मोठा वाटा होता. खरे म्हणजे आपल्या अधिकाऱ्यांची ज्ञानलालसा भागावी, यासाठीच त्यांनी ही ग्रंथालये 'नेटिव्ह जनरल लायब्ररी' या नावाने स्थापन केली. जमशेदजी नसरवानजी किंवा लोकहितवादींसारख्या स्थानिक व्यक्तींचा अपवाद वगळता बहुतेक सर्व ग्रंथालयांच्या उभारणीत ब्रिटिश अधिकाऱ्यांचा सहभाग होता.

परंतु याला एकमेव आणि सणसणीत अपवाद म्हणजे साताऱ्याचे 'नगर वाचनालय!'

उमेश करंबेळकर, 'राजहंस ग्रंथवेध', जून २०१३

दखलयोग्य

# संपादक संवादसभा

वसंत आपटे, भानू काळे

१६ फेब्रुवारी २०१३ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे येथे मराठीतील दैनिकेतर नियतकालिकांच्या संपादकांची पहिली संवाद सभा आयोजित केली गेली. समाजाची वाङ्मयीन व वैचारिक भूक भागविण्याचे महत्त्वाचे काम करणाऱ्या नियतकालिकांपुढे सध्या अनेक अडचणी आहेत व त्यांवर मात करण्यासाठी काही एकत्रित प्रयत्न व्हावेत यासाठी परस्पर परिचय व संवाद वाढवण्याची खूप गरज आहे. उपरोक्त संपादक संवाद सभा हे त्या दृष्टीने टाकलेले एक छोटेसे पाऊल आहे.

दैनिकांचे प्रश्न काहीसे निराळे आहेत आणि वेगवेगळ्या व्यवसायी संस्थांची मुखपत्रे वा राजकीय पक्षांशी संबंधित नियतकालिके यांचेही प्रश्न वेगळे आहेत. त्यामुळे अशी नियतकालिके सध्या तरी या उपक्रमासाठी विचारात घेतली नव्हती. अन्य नियतकालिकांपैकी आमच्या माहितीतील साठ नियतकालिकांना या संवाद सभेसाठी आमंत्रित केले होते व त्यापैकी चाळीस संपादक/सहसंपादक संवाद सभेसाठी संपूर्ण दिवस उपस्थित राहिले याचा आनंद वाटतो. निमंत्रितांची यादी परिपूर्ण वा अंतिम नाही याची अर्थातच आम्हांला जाणीव आहे. परंतु अशा प्रसंगी कुठेतरी, कोणीतरी यथाशक्ती यथामती सुरुवात करावी लागते म्हणूनच केवळ आम्ही हा पुढाकार घेतला.

संपादनक्षेत्रातील एक अग्रणी मुकुंदराव किर्लोस्कर या कार्यक्रमासाठी वयोमानाच्या मर्यादा असूनही सुमारे तासाभरासाठी आवर्जून हजर राहिले व आपले मनोगतही त्यांनी सर्वांसमोर व्यक्त केले हा आमच्या दृष्टीने विशेष आनंदाचा भाग. दुर्दैवाने त्यानंतर बारा दिवसांनीच त्यांचे निधन झाले व हा त्यांचा शेवटचाच कार्यक्रम ठरला. एका अर्थी ते आशीर्वाद देऊन गेले असेही वाटले.

संवाद सभेच्या शेवटी ज्यांनी कृतिगटात सहभागी व्हायची तयार दर्शवली होती त्या सर्व सोळा जणांना बुधवार, ६ मार्च २०१३ रोजी म०सा०प०मध्ये दुपारी ३ ते ५ या वेळात भरलेल्या कृतिगटाच्या पहिल्या बैठकीसाठी आमंत्रित केले होते. त्यापैकी बारा जण बैठकीला हजर होते. बैठकीच्या सुरुवातीला कै० मुकुंदरावांना श्रद्धांजली वाहिली गेली. त्यानंतर संवाद सभेचा वृत्तान्त व आर्थिक जमाखर्च सादर केले गेला. "आपण या उपक्रमाची सुरुवात केली असली, तरी हे काम पुढे नेण्यासाठी यापुढे तरुणांनी पुढाकार घ्यावा," अशी इच्छा वसंत आपटे व भानू काळे या दोघांनीही व्यक्त केली. नंतरच्या

मनमोकळ्या चर्चेत सर्वांनी आपापले मनोगत व्यक्त केले. शेवटी या बैठकीत सर्वानुमते असे ठरले की : ''ही संवाद सभा अनौपचारिक असावी - बँक खाते, संस्थात्मक नोंदणी, पदाधिकारी वगैरे रचना तूर्त पाळावी. संपर्कासाठी फक्त लेटरहेड पुरेसे असावे व शक्यतो ई-मेलचा वापर करावा. सर्व खर्च त्या त्या वेळी सहभागींनी वाटून घ्यावा.''

''दर महिन्याच्या पहिल्या बुधवारी सकाळी ११ ते १ या वेळात कृतिगटाने एकत्र भेटावे व व्यावहारिक बाबी (पोस्टिंग, आर०एन०आय०, न्यूजप्रिंट, छपाई, मुद्रितशोधन इ०) आणि प्रबोधनपर बाबी (मान्यवरांची व्याख्याने, अभ्यासदौरे इ०) या दोन्ही अंगांनी उचित कार्यक्रमांची आखणी करावी.''

अशा तीन मासिक बैठका झाल्यानंतर मग भावी वाटचालीचे नियोजन अधिक नेमकेपणाने करता येईल.

एका सकारात्मक कामाची ही सुरुवात आहे. हें आपलेच काम आहे, असे समजून सर्वांनी मन:पूर्वक सहकार्य दिले, तर यातून बरेच काही महत्त्वाचे साध्य होईल असा विश्वास वाटतो.

['अंतर्नाद', एप्रिल २०१३, पृ० ४०]

[टीप : प्रस्तुत सभेसाठी ४० संपादक उपस्थित होते. प्रस्तुत सभेतील चर्चेत सहभागी झालेल्या संपादकांमध्ये प्र०ना० परांजपे, विनोद शिरसाठ, विद्या बाळ, आनंद आगाशे, सागर देशपांडे, अशोक बेंडखळे, येसू पाटील, यमाजी मालकर, महेंद्र मुंजाळ, शाम जोशी, सूर्यकांत पाठक, आदींचा समावेश होता. कार्यक्रमाच्या शेवटी डॉ० नागनाथ कोत्तापले यांचे 'नियतकालिकांकडून आमच्या अपेक्षा' या विषयावर भाषण झाले.]

■

### काय फरक पडतो?

ऱ्हस्व वा दीर्घ काय फरक पडतो, पुढेही पडणार आहे? स्पेलिंग महत्त्वाचे की विचार (कोठे आहे तो?) महत्त्वाचा, हेसुद्धा त्या ब्रिटिशांना कळले नाही हो! उगाच शब्दाच्या अवयवांची काळजी वाहत राहिले, शेक्सपियरला कवटाळून राहिले. आता त्यांचीच नवी पिढी त्यांना सवाल करू लागली आहे : स्पेलिंग एवढे महत्त्वाचे आहे का! सायमन होरोबीन या ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीतील इंग्रजीच्या प्रोफेसरने सवाल उपस्थित करणारे 'Does spelling matter' या शीर्षकाचे नवे पुस्तकच लिहिले आहे.. आता बोला.

अरुण टिकेकर, 'लोकमत' २६ मे २०१३

# महाराष्ट्रजनविज्ञापना

गंगाधर रामचंद्र मोगरे, मुंबई

*[शंभर वर्षांपूर्वी कवीने केलेली ही विनंती आजही अर्थपूर्ण आहे. -संपादक]*

जीवनकलह भयंकर आहे सर्वत्र चालला लोकी,
त्यांत पडोनि सुरक्षित ठेवावी आपली कशी डोकी?

प्रश्न न तुमच्या, तुमच्या भाषेच्याही पुढे असे हाच;
घोर तुम्हांस न केवळ तीसहि त्याचा करीतसे जाच.

जाच सहेल कसा तरि, जीवित संशय परी तिथे आहे;
जोडूनि हात केवळ कोण शहाणा तिथे उभा राहे?

अस्तित्वावर तुमच्या भाषेच्या जो चहूकडुनि घाला
पडला संप्रति आहे, कोण तुम्हांविण निवारिता त्याला.

हिंदी म्हणते माझा सर्वांवरि चालवीन मी पगडा;
आमरणान्त तिथे तो उर्दू ह्मणते करीन मी झगडा.

मी लाडकी नृपाची, हो मज सांगेल कोण माघारी?
ऐसे म्हणूनि दारे बसली अडवूनि इंग्रजी सारी.

कोण तुम्हाविण आहे संकटसमयी अशा हिला त्राता?
बघते तुम्हांकडे ही दीनमुखे म्हणुनि भारतीमाता.

हिंदीसम मृदुमधुरा, उर्दूसमही नसेल ही नटवी,
वैचित्र्यांतहि मागे बंगालीला जरी न ही हटवी;

मुग्धा गुजराथीसम, कर्णाटीसम कलावती नाही,
न म्हणोत तेलगूसम भाषाशास्त्रज्ञ हीस ललिताही.

'बसले साहित्याची बळकावुनि मीच संपदा सर्व'
येई न इंग्रजीसम हाहि जरी वाहतां हिला गर्व;

हीचे परंतु सात्त्विक, शुद्ध, महोदात्त पाहुनी शील
वाणी हिच्या पदावर निजमस्तक कोणती न घाशील?

प्रेरी दर्भधरांसहि रणदीक्षा देउनि समररंगी,
आहे सिद्ध ह्मणाया कोण न तेजस्विता तिच्या अंगी?

लेखन, वाचन, मनन, ध्यान, सदा इंग्रजीतची चाले;
किंबहुना, मन तुमचे आहे संपूर्ण इंग्रजी झाले.

कारण हिच्या विनाशा ह्याच कृती सर्व आपुल्या झाल्या,
कृतिच न ह्या विकृति हिच्या घात तनूचा करावया आल्या.

घाला यास्तव घाला प्रेमाचा हीस आपल्या चारा;
दोहून हीस भावें आलेल्या प्राणसंकटा वारा.

घाल तुझी थोडे तरि, ही तें मानून फार घेईल;
प्रेमे दिले तुम्ही जे त्याहुनि शतपट तुम्हास देईल.

दोहाल हीस तो तो अधिकाधिक ही प्रसन्न होईल,
पुरवुनि अभीष्ट तुमचें क्लेश महीचेहि ह्या न उरवील.

विविध कलाकौशल्यी शास्त्रांवरही हिची प्रभा पाडा,
धाडा हिच्या यशाचा परिमल दाही दिशांकडे धाडा.

उद्धरुनी हीस असे घ्या करुनी आपलाहि उद्धार,
विज्ञापना असे ही, सुज्ञांना सांगणे नको फार! ■

['मनोरंजन', दिवाळी १९०९, पृ० ६५-६७ मधून संपादित अंश]

---

परिषद वार्ता

## कार्यकारी मंडळातील बदल

मराठी अभ्यास परिषदेत स्थापनेपासून सहभागी असलेल्या डॉ० मॅक्सीन बर्नसन यांनी आपल्या कार्यकारी मंडळातील सदस्यत्वाचा राजीनामा दिला आहे. त्या आता हैदराबाद येथे वास्तव्याला असतात. दि० २५ जून २०१३ ला झालेल्या कार्यकारी मंडळाच्या बैठकीत हा राजीनामा मंजूर करण्यात आला व डॉ० बर्नसन यांच्या आजवरच्या सहकार्याविषयी कृतज्ञता व्यक्त करण्यात आली. याच बैठकीत त्या रिक्त जागेवर सुशान्त देवळेकर (मुंबई) यांची सर्वानुमते निवड करण्यात आली. ■

---

## १. महाराष्ट्र दिनानिमित्त मुलाखत

१ मे २०१३ला मराठी अभ्यास परिषदेतर्फे महाराष्ट्र दिनानिमित्त खास कार्यक्रम आयोजित करण्यात आला. पुणे येथील धन्वंतरी सभागृहात सायंकाळी प्रा० प्र०ना० परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या कार्यक्रमात संगणकतज्ज्ञ डॉ० विजय भटकर यांची मुलाखत भाषातज्ज्ञ डॉ० प्रमोद तलगेरी यांनी घेतली. कार्यक्रमाचे प्रास्ताविक विजय पाध्ये यांनी केले. डॉ० तलगेरी यांनी जर्मन तसेच इतर युरोपियन भाषांच्या स्थितीमधील बदलाचे संदर्भ देत मराठीतील संभाव्य बदलांविषयी भटकर यांना प्रश्न विचारले. भटकर यांनी तंत्रज्ञानामुळे होणारे बदल स्वीकारण्यासाठी समाजमन तयार असले पाहिजे याकडे लक्ष वेधले. त्यासाठी विविध शब्दकोशांची गरज त्यांनी प्रतिपादन केली. तंत्रज्ञानाच्या साहाय्याने तत्क्षणी भाषांतराची सोय नजीकच्या काळात उपलब्ध होण्याची शक्यता त्यांनी वर्तवली. तसेच मराठीच्या भवितव्याचा विचार करता विद्यार्थ्यांना 'ई-परीक्षा' देणे बंधनकारक करण्याचा मार्ग त्यांनी सुचवला. श्रोत्यांच्या काही प्रश्नांनाही त्यांनी समाधानकारक उत्तरे दिली. नीलिमा गुंडी यांनी आभार मानले. आनन्द काटीकर यांनी सूत्रसंचालन केले. या मुलाखतीला अनेक भाषातज्ज्ञ रसिक आवर्जून उपस्थित होते. ■

## २. संगणक आणि मराठी भाषा

१५ मे २०१३ला मराठी अभ्यास परिषद आणि राज्य मराठी विकास संस्था यांच्या संयुक्त विद्यमाने एक कार्यक्रम आयोजित करण्यात आला. राज्य मराठी विकास परिषदेचे संचालक डॉ० अशोक सोलनकर यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले.

'संगणक आणि मराठी भाषा' या विषयावर महेश कुलकर्णी यांचे व्याख्यान झाले. कुलकर्णी हे 'प्रगत संगणक विकास केंद्र' (सीडॅक)च्या 'ग्राफिक्स अँड इंटेलिजन्स बेस्ट स्क्रिप्ट टेक्नॉलॉजी' (जिस्ट) विभागाचे प्रमुख आहेत. ते म्हणाले, 'डिजिटल माध्यमांमध्ये मराठीचे प्रमाण फार कमी आहे. संगणकाचे संपूर्ण काम मराठीतून करता आले पाहिजे. त्यासाठी मानकीकरण आणि स्थानकीकरण होणे व त्यात सर्वसामान्यांचा सहभाग असणे गरजेचे आहे. यासाठी उपयुक्त फाँट तयार करण्याचा प्रयत्न सीडॅक करीत आहे.

मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष प्रा०प्र०ना० परांजपे यांनी शाळा व महाविद्यालयांमध्ये 'मराठी भाषा व संगणक' असा वेगळा विषय शिकवण्याची गरज प्रतिपादन केली. कार्यवाह, आनन्द काटीकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. ■

## ३. डॉ० माधव देशपांडे यांच्याशी गप्पा

अमेरिकेतील मिशिगन विद्यापीठात अनेक वर्षे संस्कृत व प्राकृत भाषेच्या अध्यापनाचा अनुभव असलेले डॉ० माधव देशपांडे यांच्याशी अनौपचारिक गप्पांचा कार्यक्रम मराठी अभ्यास परिषद व फर्ग्युसन महाविद्यालयातर्फे २२ जून २०१३ला (फर्ग्युसन महाविद्यालयात) आयोजित करण्यात आला. डॉ० देशपांडे हे मूळचे पुण्याचे, फर्ग्युसन महाविद्यालयाचे ते माजी विद्यार्थी. जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्तीचे पहिले मानकरी. त्यांच्या ४५ वर्षांच्या अमेरिकेतील वास्तव्याचे अनुभव सांगताना त्यांनी सुरुवातीला पुण्यात त्यांना संस्कृत शिकविणाऱ्या पं० वामनशास्त्री भागवत यांच्या हृद्य आठवणी सांगितल्या. अमेरिकेतील मिशिगन विद्यापीठात ६७ भाषांचे अध्यापन केले जाते, ही त्यांनी सांगितलेली माहिती अनेकांना अचंबित करणारी ठरली. तेथील ग्रंथालयांमधील ग्रंथसंपदा, इतर संस्कृतींविषयीच्या कुतुहलातून भाषाशिक्षणातून मिळालेले महत्त्वाचे स्थान, भाषाशिक्षणा-मागील काही इतर हेतू (उदा० व्यापरउदीम, संरक्षण इ०) याविषयीही त्यांनी उद्बोधक माहिती दिली. श्रोत्यांच्या विविध प्रश्नांना उत्तरे देतानाही काही महत्त्वाचे मुद्दे समोर येत गेले. जसे की काही राज्यांमध्ये भाषांमध्ये असणारा सांस्कृतिक संघर्ष, तेथील प्रायव्हेट आणि पब्लिक स्कूलमधील भाषाशिक्षणविषयक धोरणातील तफावत, स्वतंत्र वृत्तीच्या संशोधनाला चालना देणारी तेथील शिक्षणपद्धती इत्यादी.

डॉ० देशपांडे यांनी अमेरिकेतील मराठी भाषेच्या स्थितीविषयीही माहिती पुरविली. मूळच्या मराठी भाषकांच्या पुढील पिढ्यांमध्ये मराठी लेखन वाचनाची क्षमता कमी होत आहे याकडे त्यांनी लक्ष वेधले. स्वत: देशपांडे यांनी १९७१मध्ये फिलाडेल्फिया येथे तसेच १९७५मध्ये डेट्रॉईट येथे महाराष्ट्र मंडळ स्थापन करण्यात पुढाकार घेतला होता. अशा मंडळांतर्फे मराठी भाषा व संस्कृतीचे जतन करण्याचा प्रयत्न केला जातो, हे विशेष.

डॉ० देशपांडे यांच्या 'संस्कृत आणि प्राकृत भाषा : व्याकरण, नियमन आणि शास्त्रचर्चा' या ग्रंथाला १९९७मध्ये परिषदेचा महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार मिळाला होता. परिषदेशी स्थापनेपासून संबंधित असलेल्या देशपांडे यांचे विचार ऐकायला अनेक भाषाप्रेमी अभ्यासक आवर्जून उपस्थित होते. भाषा, शिक्षण आणि संस्कृती यांच्या संबंधांतील विविध पैलूंवर प्रकाश टाकणारी ही अनौपचारिक गप्पांची मैफल सहजच रंगली. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक विजय पाध्ये यांनी केले आणि आनन्द काटीकर यांनी आभार मानले.

■





अनुक्रमणिका

प्रतिसाद १

## गेले काही अंक

नीलिमा गुंडी यांस,

'भाषा आणि जीवन'चे गेले काही अंक अत्यंत आदर्श स्वरूपाचे झाल्याचे लक्षात आले. हीच पातळी राखायचा प्रयत्न करावा. तुमचे मनापासून अभिनंदन आणि शुभेच्छा.

संपादकीय अधिकारात युक्तीने का होईना काही अशास्त्रीय 'गप्पां'ना दुरुस्त करवून घ्यावे. उदा० रमेश पानसे यांना 'अक्षर' हा भाषेचा नसून लिपीचा घटक आहे, हे पाहायला सांगावे. ह्यामुळे पुढची सगळी चर्चा 'मनाला येईल तशी' होते. ''शब्दांचे वाक्यात शिरणे ही प्राचीन माणसांची बोलीभाषेची प्रगत अवस्था आहे.'' वगैरे. (हिवाळा. पृ० २८-३०) रा० माधव आचार्य यांच्या अप्रतिम लेखामुळे अनेक अंकांनंतर ('भाषा आणि जीवन'च्या) समाधान मिळाले.

- भालचंद्र नेमाडे, बी-401, निलेश अपार्टमेंट्स, मिठागर रस्ता, कांदरपाडा, दहिसर (प०), मुंबई 400 068. ■

प्रतिसाद २

## वर्किंग लंच

संदर्भ : 'भाषा आणि जीवन', हिवाळा २०१३.

या अंकातील ई-चर्चा वाचली. 'वर्किंग लंच' ह्या शब्दाचा मूळ इंग्रजी अर्थ व मराठीत ह्या शब्दाने धारण केलेला अर्थ ह्यामध्ये तफावत आहे. मराठीत ज्या अर्थाने हा शब्द वापरला जातो, त्याकरिता 'लघुभोजन', 'चटभोजन' इत्यादी पर्याय सुचवण्यात आलेले आहेत. परंतु 'एखाद्या शब्दाचा मूळ अर्थ काही का असेना, मराठीत (...) निराळेच प्रतिशब्द योजले जातात व कालांतराने ते रूढ होऊन पक्के स्थान मिळवून बसतात.' ह्या विजय पाध्यांच्या वाक्याकडे लक्ष वेधून घेऊन मराठीत रुळलेला एक पर्याय 'वर्किंग लंच'ला सुचवावासा वाटतो.

'डबा' किंवा 'जेवणाचा डबा' हा मराठीत 'कामाच्या दरम्यान छोटी सुटी घेऊन केलेले मर्यादित अन्नसेवन यासाठी अगदी सहज दैनंदिन व्यवहारात वापरला जाणारा शब्दसमूह आहे. 'वर्किंग लंच'साठी तो सहज वापरता येऊ शकेल.

कामाच्या मध्ये थोडा वेळ काढून केले जाणारे 'अन्नसेवन' तसेच जेवणाच्या पदार्थांची परंतु मर्यादित संख्या ह्या दोन्ही गोष्टी 'जेवणाचा डबा' ह्या शब्दप्रयोगात अभिप्रेत आहेत.

'वर्किंग लंच विल् बी सर्व्हड' अशी चर्चासत्रांच्या आमंत्रण पत्रिकेत असणारी सूचना मराठीत 'जेवणाच्या डब्याची सोय करण्यात येईल' अशी देता येईल, नाही का?

अनघा भट-बेहेरे, 302, जय नर्मदा सोसायटी, 94/21-ब+22अ, गल्ली क्र० 11,
प्रभात रस्ता, पुणे 411 004.

■

प्रतिसाद ३

# शिक्षणाचे माध्यम

संदर्भ : भाषा आणि जीवन. उन्हाळा २०१३.

जपानमध्ये कोणत्याही विषयाचे कितीही उच्च शिक्षण जपानी माध्यमातून मिळते. घेता येते ही बाब कोणत्याही भारतीयाला हेवा वाटण्यासारखीच आहे, असते. पण राष्ट्राच्या पातळीवर अभिमानास्पद असलेली ही परिस्थिती आंतरराष्ट्रीय पातळीवर मात्र वेगळे रूप धारण करते. परदेशी विद्यार्थ्यांना काहीसे नाउमेद करते. जपानमध्ये शिक्षण घ्यायचे म्हणजे हिरागाना आणि काताकाना या दोन अक्षरलिपी, तसेच त्याबरोबर चित्रलिपीही शिकायची; भाषाशिक्षण घ्यायचे आणि मग विषयाच्या अभ्यासाकडे वळायचे. कमीतकमी सातशे चित्रे किंवा चिन्हे मनात ठसल्याशिवाय विषयाच्या अभ्यासाला सुरुवात करणेच शक्य नाही. यात जर यश मिळाले तर एक नवीन भाषा येणे आणि विषयाचा अभ्यास होणे असा दुहेरी फायदा आहे हे खरे, पण हे वाटते तितके सोपे नाही. त्यामुळेच शिक्षणासाठी परदेशात जायची इच्छा असलेले आशियातील विद्यार्थी जपानमध्ये येणे टाळतात आणि अमेरिकेत जाणे जास्त पसंत करतात. असे होऊ नये म्हणून तोक्यो विद्यापीठाने एक नवीन पाऊल उचलण्याचे ठरवले आहे. त्याविषयी 'जपान टाइम्स'च्या २३ जानेवारी २००८च्या अंकात आलेली ही बातमी लक्षणीय आहे.

**''अमेरिकेतील पदवीपूर्व वर्गातील विद्यार्थ्यांना आकर्षून घेण्यासाठी तोदाई इंग्लिशच्या वापराला सुरुवात करणार''**

भविष्यात धोरणविषयक निर्णय घेणाऱ्या आजच्या विद्यार्थ्यांना आपल्याकडे ओढून घेण्यासाठी जपानमधल्या अत्यंत प्रतिष्ठित मानल्या जाणाऱ्या तोक्यो विद्यापीठाने एक संपूर्ण पदवी अभ्यासक्रम पूर्णतः इंग्रजीतून शिकवण्याचा निर्णय घेतला आहे.

तोदाई या नावाने ओळखल्या जाणाऱ्या या विद्यापीठाने सामाजिक माहिती अभ्यास (सोशल इन्फर्मेशन स्टडीज) या विषयातल्या पदव्यांसाठी २००८ साली ऑक्टोबरपासून अभ्यासक्रम सुरू करण्याचा निर्णय घेतला आहे. इंटरनेट, सेलफोन आणि संज्ञापनाची इतर साधने यांचे समाजातले स्थान या विषयासंबंधीच्या अभ्यासाचा यात समावेश आहे.

यात दरवर्षी पारंगत पदवीसाठी पंधरा आणि विद्यावाचस्पती पदवीसाठी आठ विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जाईल. सार्वजनिक धोरण, राजकीय धोरण आणि वृत्तपत्रविद्या या क्षेत्रांत काम करू इच्छिणाऱ्या आशियाई विद्यार्थ्यांना डोळ्यासमोर ठेवून हे ठरवण्यात आलेले आहे. मानव्यविद्याशाखेत तोक्यो विद्यापीठाने सुरू केलेला, केवळ इंग्लिशच माध्यम असलेला हा पहिलाच उपक्रम आहे.

जास्तीत जास्त परदेशी विद्यार्थ्यांना जपानला येण्यासाठी उत्तेजन देण्यासाठी आणि त्यायोगे आशियातल्या सगळ्यात मोठ्या अर्थव्यवस्थेचा पट विस्तृत करण्यासाठी गेल्यावर्षी जपानने एशियन गेटवे इनिशिएटिव्ह ही योजना राबवली होती. ''विद्यापीठाच्या या उपक्रमामुळे अमेरिकेमध्ये शिक्षण घेण्याऐवजी जपानमध्ये शिक्षण घेऊन विद्यार्थ्यांची आशिया खंडाविषयीची समज वाढेल,'' असा विश्वास तोदाईच्या आंतरविद्याशाखीय माहिती अभ्यासविभागाचे संचालक शुन् या योशिमी यांनी व्यक्त केला.''

माधवी कोल्हटकर, 885/3, भांडारकर मार्ग, सहावी गल्ली, पुणे 411 004.

■

प्रतिसाद ४

# घोषवाक्यातील दुरुस्ती

माननीय संपादिका, 'भाषा आणि जीवन' यांसी,

स०न०वि०वि०

संदर्भ : भाषा आणि जीवन, उन्हाळा २०१२, पृ० ५६. आपण 'वाचन संस्कृतीचे घोषवाक्य' या शीर्षकाखाली पंचधारा - ऑक्टोबर ते डिसेंबर २०१०च्या अंकातील श्री० निशिकांत ठकार यांच्या लेखातील उतारा छापला आहे.

'वांछि तो विजया होईवा' हे शिलालेखातील वचन त्यामध्ये आले आहे. परंतु 'वांछि' या शब्दाचा अर्थ वाचन असा होत नाही असे माझ्या पत्नीच्या लक्षात आले. त्यामुळे या लेखाचे मूळ लेखक श्री० निशिकांत ठकार यांच्याशी मी संपर्क साधला. त्यांनी शिलालेखतज्ज्ञ श्री० आनंद कुंभार यांच्याकडे संपर्क साधण्यासाठी सांगितले. त्यांचे उत्तर मिळाले आहे, ते सोबत माहितीसाठी जोडीत आहे. त्यामुळे शोध घेतला तेव्हा वरील वचनात आनंद कुंभार यांच्या पत्रानुसार जी दुरुस्ती करायची आहे ती पुढीलप्रमाणे होईल : 'वाछि तो विजेया होऐवा'

तरी आपणास विनंती करतो की वरीलप्रमाणे हे योग्य घोषवाक्य छापून दुरुस्ती करावी.

कालिदास बा० मराठे, श्री 210, ढवळी, पो० कवळे, ता० फोंडा, गोवा 403401.

■

# [ सोबत कालिदास मराठे यांना आनंद कुंभार यांनी लिहिलेल्या पत्रातील घोषवाक्यातील दुरुस्ती ]

श्री० कालिदास मराठे यांना

स०न०वि०वि०

कुडल (ता० दक्षिण सोलापूर, जि० सोलापूर) येथील शिलालेखाचा पूर्ण पाठ खाली देत आहे.

(१) ॐ स्वस्ति सकु ९४० कालयुक्त संवत्सरे माघ कधनुळिकाळ छेळा

(२) पंडित त गछतो आयाता मछ ००० मि ०० छिमळ नि १०००

(३) वाछि तो विजेया होऐवा ॥

या लेखातील तिसरी ओळ आर्ष मराठी भाषेत असून, आतापर्यंत प्रकाशात आलेल्या प्राचीन मराठी कोरीव लेखात स्पष्ट कालोल्लेखित आद्य मराठी लेख म्हणून 'महाराष्ट्र सारस्वत' व 'प्राचीन मराठी वाङ्मया'च्या इतिहासात याची नोंद झाली आहे. हा मला कोरीव लेखांच्या संशोधनात मी क्षेत्र सर्वेक्षण करताना १९७४ शेवटी सापडला, त्याचे वाचन व संपादन करून वाईहून प्रसिद्ध होणाऱ्या 'नवभारत' मासिकाच्या जुलै १९७५ अंकात प्रसिद्ध केला. सन १९८८ साली कोरीव लेखांवर आधारित माझा एक ग्रंथ 'संशोधन तरंग' या नावाने प्रकाशित झाला, त्यात या लेखाचा समावेश केला आहे.

वरील लेखामुळे ऐतिहासिक माहितीत कोणतीही नवी माहिती मिळत नसली तरी, मराठी भाषा / त्या भाषेतील एक वाक्य - सर्वात जुने - पहिल्यांदाच उजेडात येत आहे. ज्ञानेश्वरपूर्व सुमारे ३०० वर्षे. लेखातील काही भाग अस्पष्टतेमुळे समाधानकारकपणे वाचता येत नाही.

आ०ना० कुंभार,

प्लॉट क्र० 34, अशोक चौक, ओतवारे टेक्स्टाईलजवळ, सोलापूर 413006.

■

# राईलकरांच्या अनुवादाबाबत...

संदर्भ : भाषा आणि जीवन, उन्हाळा २०१३

या अंकातील ''माझा मुलगा शाळेत संस्कृत का शिकतो?'' हा अनुवादित लेख वाचला. त्या लेखाविषयी प्रतिसाद -

( १ ) ''विवेकानंदांच्या पहिल्या भाषणाचा काळ मुळात चुकीनं १८८० दिला आहे. तो १८८३ हवा.'' असा उल्लेख अनुवादात आहे. पण मूळ लेखात विवेकानंदांच्या पहिल्या भाषणाचा काळ नव्हे, तर विवेकानंदांच्या जागतिक धर्मपरिषदेतील भाषणाचे वर्ष दिले आहे; पण ते चुकीनं १८८० दिले आहे. प्रत्यक्षात ते वर्ष १८८३ही नाही. १८९३ आहे.

( २ ) आणखी एक चूक मूळ लेखात आहे, ती अनुवादात तशीच आली आहे. ''चॉसरचे 'पिल्ग्रिम्स प्रोग्रेस' इ०स० ७००च्या आसपास रचले गेले.'' असे म्हटले आहे. वस्तुतः चॉसरचा काळ १३४३(अंदाजे) ते १४०० असा होता व *Pilgrim's Progress* त्याने लिहिले नाही. *The Pilgrim's Tale* त्याच्या नावावर टाकले जाते, पण तेही शंकास्पद मानले गेले आहे. *Pilgrim's Progress* हे जॉन बन्यन या लेखकाचे पुस्तक १६४८मध्ये लिहिले गेले.

डॉ० सुप्रिया सहस्रबुद्धे, विक्रम हाइटस्, राहुलनगरसमोर, कोथरूड, पुणे 411 029.

■

**कहाणी नामांतरांची**

साताऱ्याचे 'नगर वाचनालय' हे मूळ प्रतापसिंह महाराजांचे स्वतःचे खाजगी ग्रंथालय होते. प्रतापसिंहांचे बंधू शहाजी यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या पत्नी सगुणाबाई यांनी हे ग्रंथालय सर्वांसाठी खुले केले.

२००८ साली विजयादशमीच्या मुहूर्तावर या ग्रंथालयाचे 'श्री० छ० प्रतापसिंह महाराज (थोरले) नगर वाचनालय, सातारा' असे नामकरण करण्यात आले. या ग्रंथालयाने नुकताच शतकोत्तर हीरक महोत्सव साजरा केला.

**उमेश करंबेळकर**, राजहंस ग्रंथवेध, जून २०१३

स० न०वि०वि०

'भाषा आणि जीवन'मधे (वर्ष ३१, अंक १, हिवाळा २०१३) प्रकाशित झालेल्या 'बहुमुखी साहित्य व्यवस्थेच्या अंतर्गत भाषांतरित साहित्याचे स्थान' या माझ्या अनुवादित लेखात काही संदर्भ द्यायचे राहून गेले होते. त्याबद्दल दिलगिरी व्यक्त करतो. ते संदर्भ असे -

(१) मूळ इंग्रजी लेख -

Itamar Even - Zohar. "The Position of Translated Literature within the Literary Polysystem. "Poetics Today 11:1 (1900), pp. 45-51.

(२) टोरी

Toury, Gideon

1985 "Translational Solutions on the Lexical Level and the Dictionary," in International Conference on Meaning and Lexicography: Abstracts: Lodz, 19-21 June 1985, edited by Jerzy Tomaszczyk and Barbara Lewandowska - Tomaszczyk, 87-89 (Lodz: University Lodz, Institute of English Studies).
1985a "A Rationale for Descriptive Translation Studies," in The Manipulation of - Studies In Literary Translation, ed. Theo Hermans. London & Sydney : Croom Helm, 16-11.

■

पद्माकर दादेगावकर, 202/203, 2-2-1075/25, आर्चीज क्लासिक अपार्टमेंट, टिळकनगर क्रॉसरोड, अंबरपेठ, हैदराबाद, (आंध्र प्रदेश) 500013.

---

## लेखक-परिचय

■ **आचार्य,** माधव नारायण : एम०ए०, मराठीचे निवृत्त प्राध्यापक. 'अनुषंग' (१९८१), 'मराठी व्याकरण विवेक' (१९९०, २००१), (महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक), 'ज्ञानमयूरांची कविता' (१९९३), 'आर्याभारत : नवदर्शन' (१९९७) ही पुस्तके प्रकाशित. 'मोरोपंतांची सतिगीते' (१९८५, १९९४), ' मोरोपंत विरचित संशयरत्नावली' (१९८५), 'मोरोपंतकृत श्लोककेकावली' (१९९४) या पुस्तकांचे संपादक. पैकी शेवटच्या पुस्तकास महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभेचे पारितोषिक. 'पंचपदवी ज्ञानदेवी' या ग्रंथाला महाराष्ट्र शासन पुरस्कोर व संत साहित्य पुरस्कार. 'ध्वनिताचें केणें' या ग्रंथाला मराठी अभ्यास परिषदेचा पुरस्कार.

टपाल-पत्ता : मु० व पोस्ट चौल, ता० अलिबाग, जि० रायगड 402 203.
स्थिरभाष : (0214) 240 362.

---

■ **काळे,** अक्षयकुमार मल्हारराव : ज्येष्ठ काव्यसमीक्षक, १९८०पासून अध्यापन. सध्या नागपूर विद्यापीठाचे मराठी विभाग प्रमुख, 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' हा बृहद समीक्षा-ग्रंथ. (त्यासाठी डी.लिट् ही सर्वोच्च पदवी प्राप्त). 'कुसुमाग्रजांची कविता', 'मर्ढेकरांची कविता : आकलन आणि आस्वाद', 'ग्रेसविषयी' इ० ग्रंथ प्रकाशित. अनेक पुरस्कार प्राप्त. विद्यापीठ स्तरावर तसेच सामाजिक संस्थांमध्ये शैक्षणिक व साहित्यिक कार्यात सक्रीय सहभाग. विदर्भ साहित्य संघाच्या जनसाहित्य संमेलनाचे अध्यक्षपद आदी सन्मान प्राप्त.
टपाल-पत्ता : 'प्रतिक्षा', प्लॉट क्र० 57, नरकेसरी लेआउट, जयप्रकाश नगर, नागपूर 25.
चलभाष : 9325005871

■ **गुंडी,** नीलिमा : एम०ए०, पीएच०डी०, डी०एच०ई०, निवृत्त उपप्राचार्य, स०प० कनिष्ठ महाविद्यालय (पुणे), कविता, ललित, वैचारिक, समीक्षा, बालसाहित्य व संपादन या प्रकारचे लेखन. स्वतंत्र १५ पुस्तके प्रकाशित आणि सहा पुस्तकांसाठी संपादन सहकार्य. लेखनासाठी दोन राज्यपुरस्कारांसह एकूण आठ पुरस्कार प्राप्त.
टपाल-पत्ता : 1259, 'अन्नपूर्णा', सुभाषनगर, शुक्रवार पेठ, पुणे 411 002.

■ **देवरे,** सुधीर : एम०ए०, पीएच०डी०, भाषा, कला, लोकजीवन व लोकवाङ्मयाचे अभ्यासक, अहिराणी भाषा संशोधक, 'ढोल' या अहिराणी नियतकालिकाचे संपादक सदस्य, महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती. 'दोन काव्यसंग्रह, 'पंख गळून गेले तरी' हा आत्मकथन व 'अहिराणी लोकपरंपरा', कला आणि संस्कृती : एक समन्वय' अशी ग्रंथसंपदा, लेखनाबद्दल तीन पुरस्कार प्राप्त.
टपाल-पत्ता : सायास, टेलिफोन कॉलनी, सटाणा, जि० नाशिक 423 301.
चलभाष : 094222 70837 ई-पत्ता : sudhirdeore2g@rediffmail.com

■ **देवळेकर** सुशान्त : सध्या राज्य मराठी विकास संस्थेत कनिष्ठ संशोधन साहाय्यक पदावर कार्यरत. २००२ ते २००८ या दरम्यान भारतीय तंत्रज्ञान संस्था (आय०आय०टी०) मुंबई येथील भारतीय भाषाकेंद्रात भाषातज्ज्ञ म्हणून सेवेत. 'मराठी शब्दबंध' हा कोश व मराठी शब्दरूपांची विश्लेषण करणारी संगणकप्रणाली विकसित करण्यात सहभाग. युनिकोडविषयक मार्गदर्शनपर कार्यशाळामध्ये सहभाग.
टपाल-पत्ता : D 605, सुबोध सागर वसाहत, श्रीप्रस्थ चौथा मार्ग, निळेमोरे, नालासोपारा ता० वसई जि० ठाणे 401 203 चलभाष : 097698 35310

■ **धडफळे,** मो०गो० : फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे ३८ वर्षे संस्कृत व पाली भाषांचे अध्यापन. टिळक महाराष्ट्र विद्यापीठात युरोभारतीय भाषाविज्ञानाचे अध्यापन. अनेक इंग्रजी ग्रंथ प्रकाशित तसेच 'साहित्य सावित्री', 'पालिबौद्ध संतसाहित्य', 'धर्मानंद कोसंबी : पालि-बौद्ध धर्माचे भाष्यकार' आदी अनेक मराठी पुस्तके प्रकाशित. इराण शासनातर्फे इराण भाषातज्ज्ञ म्हणून तसेच जम्मूकश्मीर विद्यापीठातर्फे मंजुश्री पुरस्कार देऊन गौरव.
टपाल-पत्ता : 2 'यशोदीप-ब',रामबाग वसाहत, सदाशिव पेठ, पुणे 411 030.
स्थिरभाष : (020)2433 2081

■ **धारूरकर,** चिन्मय विजय : एम०ए०,एफ०फिल० (भाषाशास्त्र). आय०आय०टी०(मुंबई) येथून पीएच०डी० प्रबंधाचा अभ्यास सुरू. संस्कृत, उर्दू, बांगला, गुजराती, कोंकणी, तेलुगु, पर्शियन आदी भाषा अवगत. अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय चर्चासत्रामधून निबंध सादर. नियतकालिकांमधून लेख. तसेच साहित्य समीक्षा, तत्त्वज्ञान, भाषाविज्ञान या विषयांतील अनुवाद प्रसिद्ध.

टपाल-पत्ता : अर्णव C-1 फेज 1 दिशा, नभांगण, N-2 सिडको, औरंगाबाद 431006

स्थिरभाष : (0240) 2474 881 चलभाष : 09371677728

ई-पत्ता : chinmayvijay@gmail.com.

● **बेलवलकर,** (डॉ०) सुमन : पश्चिम विभागीय भाषा केंद्र ( पुणे ) येथे अमराठी विद्यार्थ्यांसाठी मराठीचे अध्यापन, तेथील प्राचार्यपदावरून निवृत्त. *बेलभाषा* (भाषाविषयक स्फुटलेखन), *मराठी शारदीयेच्या चंद्रकळा* (संपादन) व *लीळाचरित्रातील समाजदर्शन* ही पुस्तके प्रकाशित. महाराष्ट्र साहित्य परिषदेचा 'रा०श्री० जोग समीक्षा पुरस्कार'.

टपाल-पत्ता : फ्लॅट 2, ए 3 'सितार', नादब्रह्म हाउसिंग सोसायटी, वारजे, पुणे 411 058.

स्थिरभाष : (020) 2523 4142 चलभाष : 090289 98199

■ **मोरे,** नंदकुमार : एम०ए०,पीएच०डी०, नेट, 'मराठी कादंबरीची समाजभाषा-वैज्ञानिक चिकित्सा' या विषयावर प्रबंध. 'समीक्षा पद्धती : सिद्धांत आणि उपयोजन' या पुस्तकाचे संपादन. साहाय्यक प्राध्यापक, वसंतराव नाईक शासकीय कला व समाजविज्ञान संस्था, नागपूर.

टपाल-पत्ता : मु०पो० हलकर्णी, ता० चंदगड, जि० कोल्हापूर 416 552.

चलभाष : 094226 28300; ई-पत्ता : nandkumarmore@ymail.com

■ **मोहनी,** दिवाकर - मुद्रणतज्ज्ञ, लिपितज्ज्ञ, विवेकवादाला वाहिलेल्या 'आजचा सुधारक' या नियतकालिकाच्या संपादक मंडळाचे सदस्य.

टपाल-पत्ता : गौरीवंदन, 123, शिवाजीनगर, नागपूर 440 010.

चलभाष : 09881900608

■ **शेळके** नीलेश केदारी : डॉ० घाळी कॉलेजमध्ये अध्यापन.

टपाल-पत्ता : डॉ० घाळी कॉलेज, गडहिंग्लज, ता० गडहिंग्लज, जि० कोल्हापूर 416502.

चलभाष : 90284 75592

